अशा प्रकारें कालक्रम चालला असतां, एकदां वसंतऋतूचा बहर आलेला पाहून मृगयेस जाण्याची कल्पना त्याला आली. मृगयाविहारांत होणाऱ्या व्यायामामुळें शरीर काटक होतें, चपळ होतें, सुटसुटीत होतें व सहनशील होतें. धावत्या सावजावर नेम मारावा लागत असल्यामुळें शरसंधानकलेचा चांगला अभ्यास होतो. शिवाय रानावनांतल्या पशूंच्या चर्या क्रोधानें व भयानें कसकशा पालटतात हें कळून येतें. किंबहुना शिकार करण्यानेंच पशुपक्ष्यादिकांच्या स्वभावाचें सम्यक् ज्ञान करून घेतां येतें, इत्यादि हितकर गोष्टी मनांत आणून अमात्यांनीं दशरथाला मृगयेस जाण्याला अनुमति दिली.

दशरथ मृगयेस निघाला. त्यानें मृगयावेष धारण केला. अंगांत झाडाच्या पाल्याप्रमाणें हिरव्या रंगाचें चिलखत चढवून गळ्यांत धनुष्य अडकविलें; अवश्य तें सैन्य व कांहीं विलासोपयोगी पदार्थ बरोबर घेऊन तो निघाला. त्याचा घोडा भरधांव चालला असतां त्याचीं कुंडलें लुट्लुट् हलतांना दिसूं लागलीं.

शिकारी कुत्रे, जाळीं वगैरे बरोबर घेऊन व्याधलोक पुढें गेले होतेच. तिकडेच हरणें, पक्षी, गवे, रानडुकर इत्यादि प्राण्यांनीं भरलेल्या अरण्यांत तो शिरला व मृगांचा पाठलाग करूं लागला. हरिणी जीव घेऊन पटापट उड्या मारीत पळूं लागल्या; पण घास चघळत असलेलीं हरिणशावकें हरिणींना बिलगून मध्येंच लुडबुडूं लागल्यानें त्यांना अडथळा होऊं लागला. हरिणींच्या व राजांच्या मध्यें हरिण येऊन त्यांचा जीव वांचवूं लागले. तें पाहून राजाचें अंतःकरण द्रवलें व कर्णापर्यंत खेचलेला बाण त्यानें परत घेतला.

नंतर घोड्यावरून खालीं वांकून तो झाडाला टेकून बसलेल्या रानडुकरांवर प्रहार करूं लागला. तेहि डोक्यावरचे केस उभारून

त्याच्यावर हल्ला करण्याचा विचार करतात तोंच ते तेथल्यातेथें मरून पडूं लागले. इतक्यांत एक गवा दशरथावर धाऊन आला असतां, त्याचा डोळाच दशरथानें शरानें विद्ध केला; त्यासरशीं तो प्राणी प्रथम भूमीवर दाणकन् आदळला व त्याच्या नेत्रांत घुसलेला तीक्ष्ण बाण आरपार जाऊन मग खालीं पडला.

यापुढें तो गेंड्यांकडे वळला. त्यानें त्यांचीं शिंगें छाटून त्यांचा शीर्षभार जणूं हलका केला. पण त्यांचें जीवित मात्र त्यानें हरण केलें नाहीं. असें करण्याचें कारण त्याला त्यांच्या जीविताचा हेवा वाटत नसून दर्पसूचक अशा उंच वाढलेल्या त्यांच्या शृंगांचा मात्र हेवा वाटत होता. दुसऱ्या बाजूच्या गिरिगव्हरांतून एक वाघ चवताळून बाहेर पडला व दशरथाच्या अंगावर उसळला; तोंच त्याचा जबडा दशरथानें बाणांनीं भरून काढून जबड्याला भात्याचें स्वरूप आणिलें! त्याच्या धनुष्याच्या टणत्कारानें झाडींत लपलेल्या सिंहांनाहि चेव आला. त्यांच्या पंजांना हत्तींच्या गंडस्थळांतील मोत्यें चिकटलेलीं होतीं, त्यांचा मत्सर वाटून कीं काय, या राजसिंहानें त्यांना ठार केलें व यायोगें स्वतःस युद्धांत साहाय्य करणाऱ्या गजराजांच्या ऋणांतून तो एकप्रकारें मुक्त झाला.

याप्रमाणें राजाला मृगयेनें वेडावून सोडिलें. मृगयाविहार झाल्यावर ती रात्र त्यानें तेथेंच रानफुलांच्या शय्येवर स्वस्थ झोंपून घालविली.

# कथा चवदावी

## शाप नव्हे वरच !



दुसऱ्या दिवशीं पहाटेस उठल्यावर दशरथानें मृगयेस पुनः प्रारंभ केला व अश्वारूढ होऊन एका हरिणीच्या मागें लागून तो तमसा नदीवर आला. त्याचे अनुचर मागें राहिले होते. तेथें तीरावर कोणी एक मनुष्य पाण्यानें घडा भरीत असतां त्याचा होणारा गुड्गुड् असा ध्वनि राजाला दुरून ऐकूं आला. तो शब्द हत्तीचा असावा असें त्यास वाटलें आणि स्वतःचें शब्दवेधित्व प्रकट करण्यासाठींच त्यानें त्याच्याकडे नेमका बाण सोडला. वस्तुतः रानहत्तीवर शरसंधान करणें अयोग्य; शास्त्रानें त्याचा स्पष्ट निषेध केला आहे. पण या प्रसंगीं राजानें शास्त्राज्ञेचें उल्लंघन केलें. सुज्ञ पुरुषहि प्रसंगीं भावनावश होऊन विपरीत कर्म करितो याचें हें उदाहरण होय.*

दशरथाचा बाण सूं सूं करीत इष्टस्थळीं जाऊन पोंचतांच 'मेलों हो मेलों' अशी हृदयभेदक किंकाळी त्याच्या कानीं पडली. तो लगेच तेथें धावत गेला व पाहतो तों, कोणी मुनिपुत्र उदकानें कुंभ भरीत आहे व त्याच्या हृदयांत बाण रुतला आहे असें त्याला आढळून आलें. त्याची ती शोचनीय अवस्था पाहतांच तो बाण जणूं आपल्याच काळजांत घुसल्यासारखें राजास दुःख झालें. तसाच तो घोड्यावरून खालीं उतरला आणि त्या ऋषिकुमाराला 'तूं कोण, कोणाचा मुलगा' असें विचारूं लागला. त्याच्या तोंडांतून अडखळतच उत्तर आलें. तें ऐकून त्याला राजानें उचलून त्याच्या मातापितरांकडे नेलें व आपल्या हातून कसा

* अपथे पदमर्पयन्ति हि श्रुतवन्तोऽपि रजोनिमीलिताः ।

अपराध घडला हें त्यांस सांगितलें. तेव्हां त्यांच्या हृदयांत चर्र होऊन तीं विलाप करूं लागलीं. राजानें त्यांच्या सांगण्यावरून मुलाच्या हृदयांतील शल्य उपटून काढलें; त्याबरोबर तो गतप्राण झाला. मुलाच्या वृद्ध पित्यानें अश्रुजलच हातांत घेऊन राजाला शाप दिला. तो म्हणाला—

"हे राजा, तुला वृद्धावस्था प्राप्त झाली असतां माझ्याप्रमाणेंच, 'हायरे पुत्रा, हायरे पुत्रा' असा शोक करीत प्राण सोडावा लागेल."

हा शाप ऐकून तो वृद्ध मनुष्य म्हणजे शेपटीवर पाय पडलेला व म्हणून विष ओकणारा असा सर्पच आहे कीं काय असें राजास वाटलें. तथापि शेवटीं तो त्याला म्हणाला, "महाराज, आपण मला शाप दिला खरा, परंतु पुत्रमुख पाहण्याचें भाग्य अद्यापि मला न लाभल्यामुळें माझ्या संबंधानें तो जणूं काय वरच झाला आहे! अग्नि बाह्यतः भूमीला जाळतोसा वाटतो, पण त्या जाळण्यानें भूमि अधिकच उत्पादनक्षम होते. मुनिराज, मी मोठा दुष्ट खरा. माझ्या हातून झालेल्या घोर पातकाबद्दल मला वधाची शिक्षा योग्यच आहे; तरी पण आतां मी आपणासाठीं काय करावें तेवढें कृपा करून मला सांगा."

दशरथाचें भाषण ऐकून वृद्ध मुनि म्हणाला, "राजा, आतां आम्हांला जगून तरी काय करावयाचें? आम्ही मुलाबरोबरच सहगमन करणार. चिता सिद्ध कर." इतक्यांत राजाचे परिचर तेथें आले. त्यांच्याकडून वृद्धाच्या सांगण्याप्रमाणें सर्व व्यवस्था करवून, एकप्रकारें उद्विग्न व एकप्रकारें उल्लसित होऊन दशरथ अयोध्येस परत आला. तथापि न कळत घडलेल्या पापाचें शल्य त्याच्या मनांत सारखें सलत राहिलें व सागरांतील वडवाग्नीप्रमाणें तें त्याला स्वास्थ्य लाभूं देईना.

---

* कृष्यां दहन्नपि खलु क्षितिमिन्धनेद्धो बीजप्ररोहजननीं ज्वलनः करोति।

# कथा पंधरावी
## संभवामि युगे युगे



दशरथाला सर्व सुखसाधनें अनुकूल होतीं; पण एकाच गोष्टींत मोठें न्यून होतें. कोसल देशाची राजकन्या कौसल्या, केकय देशाची कैकेयी व मगधाधिपतीची सुमित्रा अशा त्याच्या तीन अभिषिक्त राण्या असूनहि त्यास पुत्रसंतान नव्हतें. अर्थात् पितरांचें ऋण फेडणारी व शोकरूपी अंधकार नष्ट करणारी पुत्रज्योति घरांत नसल्यामुळें त्यास निरंतर दुःख होई.

म्हणून ऋष्यशृंगऋषींनीं दशरथाकरितां पुत्रकामेष्टि करण्यास प्रारंभ केला. याच सुमारास स्वर्गलोकांतील देव रावणाच्या त्रासानें गांजून गेले होते. आतपानें क्लान्त झालेले पथिक जसे वृक्षाकडे धावतात तसे ते देव क्षीरसागरनिवासी भगवान विष्णूकडे सत्वर धावत गेले. ते तेथें पोंचले नाहींत तोंच तो आदिपुरुष योगनिद्रेंतून जागा झाला. तेणेंकरून देवांच्या गाऱ्हाण्यांची दाद लागणार असें जणूं सूचित झालें. *

भगवान विष्णु शेषशयनावर पहुडले होते. शेषाच्या फणांतील रत्नांची प्रभा त्यांच्या सर्वांगावर झळकत होती. भगवती लक्ष्मी कमलासनावर अधिष्ठित असून पतीचे चरणकमल तिनें आपल्या अंकावर ठेविलेले होते. भगवानांच्या विशाल वक्षःस्थलावर तेजस्वी कौस्तुभमणी विराजत असून त्यांत लक्ष्मीदेवी आपलें मुखकमल पाहात होती. पक्षिराज गरुड पुढें हात जोडून उभा होता. अशा त्या परमेश्वराला पाहून देवांनीं त्यास अभिवादन केलें व ते त्याचें स्तवन करूं लागले.

---

* अव्याक्षेपो भविष्यन्त्याः कार्यसिद्धेर्हि लक्षणम् ।

## देवकृत विष्णुस्तुति

देव म्हणाले, ‘ हे विष्णो, तूंच एक स्तुतीला पात्र आहेस, पण वाणी आणि मन यांना तुझ्या स्वरूपाचें आकलन होत नसल्यामुळें तुझी स्तुति करावी तरी कशी ? तूंच प्रथम विश्व निर्माण करून, मग त्याचें रक्षण करितोस आणि शेवटीं तूंच त्याचा लय करितोस. असा तूं त्रिविध स्वरूपी आहेस. तुला आम्ही नमन करतों. पावसाच्या पाण्यास मूळचा एकच मधुर रस असतो; पण स्थितिभेदानें त्याला निरनिराळी चव प्राप्त होते, तसेंच तुझेंहि आहे. तूं वस्तुतः अविकार्य असतांहि सत्त्वादि गुणांच्या योगानें त्रिविध रूप धारण करितोस. तूं स्वतः अपरिमेय आहेस, पण इतर सर्वांची परिमिति तूं करितोस. तूं स्वतः निःस्पृह असतांहि प्रार्थनावश होऊन इतरांचे मनोरथ पुरवितोस. तुला जिंकणारा कोणी नाहीं, पण तूं मात्र सर्वथा विजयशाली आहेस. सर्व व्यक्त वस्तुमात्राचा उत्पादक असतांहि तूं स्वतः सर्वस्वी अव्यक्त आहेस. परमेशा, तूं सर्वांच्या हृदयांत वास करीत असूनहि त्यांना दूरसा वाटतोस.

हे भगवन्, तूं सर्वांचा आदि असा पुराण पुरुष असतांहि तुला वृद्धावस्था कधीं स्पर्श करीत नाहीं. तूं सर्व जाणतोस, पण तुला मात्र कोणी जाणीत नाहीं. तुझ्यापासून सर्वांची उत्पत्ति झाली आहे, पण तूं मात्र स्वयंभूच आहेस. तूं सर्वांचें नियमन करतोस, तुझें नियमन मात्र कोणीच करीत नाहीं. तूं तत्त्वतः एकच आहेस, पण अनंत रूपें मात्र धारण करितोस. मोक्षप्राप्तीसाठीं दीर्घ प्रयत्नानें मनाचें नियंत्रण करून त्याच्या साह्यानें योगिजन तुझ्या ज्योतिःस्वरूपाचा शोध करीत असतात, पण तूं तर त्यांच्या हृदयांतच असतोस. अज असतांहि जन्म घेणारा, निरिच्छ असूनहि शत्रुनिर्दालन करणारा आणि नित्य योगनिद्रा अनुभवीत असूनहि सदैव

जागृत राहणारा असा तूं आहेस. तुझें स्वरूप यथार्थपणें कोणास कळणार ? एकीकडे शब्दादि पंच विषयांचा यथेच्छ उपभोग घेत असून दुसरीकडे नरनारायण रूपानें दुर्घट तप करणें, किंवा सर्व लोकांचें यथोचित पालन करीत असतांहि सर्वत्र उदासीनपणें वागणें हें तुलाच शक्य आहे.

परमेश्वरा, मोक्षप्राप्तीचे विविध मार्ग विविध शास्त्रांनीं सांगितले असले, तरी गंगेचे सारे फांटे जसे एका समुद्रासच मिळतात, तसे ते सारे मार्ग तुझ्याच ठिकाणीं शेवटीं एकवटतात. तुझ्या ठायीं चित्त स्थिर करून सर्व कर्में तुलाच अर्पिणाऱ्या वैराग्यशील पुरुषांना जन्ममृत्यूंपासून सुटण्याचें साधन तूंच आहेस. तुझें ऐश्वर्य दाखविणारीं पृथिव्यादि भूतें प्रत्यक्ष दिसत असतांहि त्यांचें मोजमाप करणें दुर्घट आहे; आणि तूं तर यथार्थवक्ते वेद आणि तदनुसारी अनुमान यांनींच केवळ ज्ञात होणारा. यास्तव तुझें मोजमाप कोणाला व कसें होणार ? तुझें केवळ स्मरण केल्यानेंहि मनुष्य निष्पाप होतो; मग तुझ्या दर्शनसेवनादिकांचें फल काय वर्णावें ? समुद्रांतील रत्नांचें किंवा सूर्याच्या तेजःकिरणांचें वर्णन कितीहि केलें तरी तें वस्तुस्थितीच्या मानानें न्यूनच पडतें. तुझ्या चरित्राचेंहि तसेंच आहे. मिळविण्यासारखें असून तूं मिळविलेलें नाहींस असें तुझ्यासंबंधानें कांहींच म्हणतां येत नाहीं. अर्थात् तुझ्या अवतारकृत्यांचा उद्देश लोकरक्षण हाच एक होय. तुझ्या महिम्याचें वर्णन करतां करतां वाणी विराम पावते; पण त्या विरामाचें कारण पुढें वर्णन करण्याचें तिला सामर्थ्य राहात नाहीं हेंच असतें; तुझे गुण संपले असें कधींच होत नाहीं."

अशाप्रकारें आपली स्तुति श्रवण केल्यावर भगवान विष्णूंनीं देवांना कुशल प्रश्न विचारून त्यांजविषयीं आपलें प्रेम व्यक्त केलें. मग रावणापासून आपणांस कसा त्रास होत आहे हें निवेदन केल्यावर, त्या त्रासांतून

मुक्त करण्याविषयीं, देवांनीं परमेश्वराची प्रार्थना केली. तेव्हां क्षीरसागराच्या तीरावरील पर्वताच्या गुहांतून अनुनादित होणाऱ्या गंभीर स्वरानें पुराणकवि उत्तर देऊं लागले. ते म्हणाले—

"देवहो, तुमचें तेज व पराक्रम रावणानें नष्ट करून टाकिलीं आहेत हें मला कळलें. अखिल त्रिभुवनाला त्याचा कसा जाच होत आहे हेंहि मला माहीत आहे. तुम्हांला आतां एवढेंच सांगतों कीं, याविषयीं तुम्ही माझी प्रार्थना करण्याची अवश्यकता नाहीं. तुमचें जें कार्य तेंच माझेंहि आहे. वन्हीचें सारथ्य करावयाला वायूला हाक मारण्याची काय गरज ?* रावणानें शिवपूजाप्रसंगीं आपलीं नऊ शिरें स्वतःच्या हातांतील खड्गानें तोडून दहावें वगळून ठेविलें, तें जणूं माझ्या सुदर्शनासाठींच होय. चंदनवृक्ष सर्पाचें आक्रमण सहन करितो, तद्वत् रावणाचा उन्मत्तपणा व धृष्टपणा मी आजवर सहन केला, तो केवळ ब्रह्मदेवाच्या शब्दासाठींच होय. त्यानें विधात्याला घोर तपानें संतुष्ट करून त्याच्या देवसृष्टींतील कोणापासूनहि आपणास मृत्यु येऊं नये असा वर मागून घेतला आहे. मनुष्य प्राणी त्यास कःपदार्थ वाटतो, यास्तव मी भूलोकीं दशरथाचा पुत्र होऊन त्याच्या शिरकमलांचा रणदेवतेस बलि देणार आहें. आतां लवकरच राक्षसांपासून यज्ञाला होणारा उपद्रव बंद होऊन तुम्हांला तुमचा हविर्भाग यथापूर्व मिळूं लागेल. यापुढें विमानांतून फिरतांना रावणाच्या पुष्पक विमानाला भिऊन मेघांच्या आड लपण्याचें तुम्हांस कारण पडणार नाहीं." रावणाच्या पीडेनें हतप्रभ झालेल्या देवांना याप्रमाणें आपल्या वाणीरूपी अमृतानें शांत करून भगवान अंतर्धान पावले.

इकडे ऋष्यश्रृंगानें प्रारंभिलेल्या यज्ञाच्या समाप्तीची वेळ आली असतां अग्नींतून एक देदीप्यमान पुरुष अकस्मात् बाहेर आला. त्याला पाहून

* स्वयमेव हि वातोऽग्नेः सारथ्यं प्रतिपद्यते ।

कै० तीर्थरूप शंकर भास्कर नवरे,

नमुनेदार प्राथमिक शिक्षक,

कै० गुरुवर्य महादेव पाण्डुरङ्ग ओक,

संस्कृत शिक्षक, न्यू. इं. स्कूल, पुणें,

व

कै० गुरुवर्य डॉ. पाण्डुरङ्ग दामोदर गुणे

संस्कृतचे प्रोफेसर, फर्ग्युसन कॉलेज, पुणें,

या

शिष्यवत्सल संस्कृत-गुरुत्रयीस

हा ग्रंथ

त्यांच्या नम्र शिष्यानें प्रेमादरपूर्वक

अर्पिला असे.

# प्रस्तावना



संस्कृत कवींचीं नाट्यकथानकें व कादंबरीकथा ह्या दोन पुस्तकांत अनुक्रमें उत्तमोत्तम संस्कृत नाटकें व बाणभट्टकृत कादंबरी यांच्या कथा तीन चार वर्षांपूर्वी प्रसिद्ध केल्या. त्या आबालवृद्ध वाचकांस आवडल्या. नाट्यवाङ्मय व कादंबरी यानंतर पंचमहाकाव्यांकडे वळण्याबद्दल अनेक विद्वानांकडून सूचना आल्या. त्याप्रमाणें आतां काव्यप्रांतांत प्रवेश करून मी कविकुलगुरु कालिदास याच्या रघुवंश महाकाव्याचा महाराष्ट्र वाचकांस परिचय करून देत आहें आणि मला असा विश्वास वाटतो कीं, हा माझा अभिनव प्रयत्न संस्कृत-मराठी वाचकांस तितकाच उपयुक्त व प्रिय होईल.

नाट्यवाङ्मयांत जसें शाकुन्तल नाटक, तसें काव्यवाङ्मयांत रघुवंशकाव्य सर्वानुमतें श्रेष्ठ होय. परंतु आंग्ल कवि मिल्टन याच्या 'पॅरॅडाइज लॉस्ट' या काव्याची तिकडे जी गत तीच थोड्या फार अंशानें रघुवंश या काव्याची आमच्याकडे आहे असें म्हटलें तरी चालेल ('Milton is more admired than read'). मिल्टनच्या पॅरॅडाइज लॉस्टच्या बारा विभागांपैकीं एक दोन विभागांपलीकडे कॉलेजांतून त्याचें वाचन होत नाहीं. तद्वत् जुन्या पाठशालीय पद्धतीप्रमाणें अगर आधुनिक शाळाकॉलेजांतील अभ्यासक्रमाप्रमाणें चार दोन सर्गांपलीकडे रघुवंशाचें अध्ययन क्वचितच होतें. एवंच ह्या काव्याचा सामग्र्यानें अभ्यास व्हावयास पाहिजे तो कोठेंच होत नाहीं.

संस्कृत पाठशाळेंत जाणारा विद्यार्थी रूपावलिसमासचक्राच्या फेऱ्यांतून बाहेर पडल्यावर 'व्युत्पत्ति'ज्ञान संपादण्यासाठीं 'रघू'चाच आश्रय करितो. रघूच्या पहिल्या सर्गांत दिलीपाला कामधेनूचा शाप झाला असल्याकारणानें शास्त्रीपंडित 'वागर्थाविवसंपृक्तौ' (सर्ग १, श्लोक १) या श्लोकापासून प्रारंभ न करितां दुसऱ्या सर्गाच्या 'अथ प्रजानामधिपः प्रभाते' येथूनच पढविण्यास सुरवात करितात. वास्तविक म्हटलें तर भगवद्गीतेच्या पहिल्या अध्यायाचें जें महत्त्व तेंच रघूच्या प्रथम सर्गाचें होय. ग्रंथाची भूमिका समजण्यास त्याचें अध्ययन होणें इष्ट आहे.* निदानपक्षीं विद्यार्थ्यांच्या डोळ्यांसमोर पूर्वींचें कथासूत्र

---

* पहिल्या सर्गांत कालिदासानें आपला अत्यंत आवडता सिद्धांत मांडलेला आहे, तो असा: प्रतिबध्नाति हि श्रेयः पूज्यपूजाव्यतिक्रमः (सर्ग १,७९)

असल्याविना त्याच्या ठायीं ‘ पुढें काय झालें ? ’ ही उत्सुकता निर्माण होणें अशक्य होय.

दुय्यम शिक्षणसंस्थांतून वरच्या वर्गांत आपटे यांचें संस्कृत गाईड शिकविण्याचा प्रघात आहे. गाईडमध्यें असा क्वचितच धडा असेल कीं ज्यांत रघुवंशांतले श्लोक आले नाहींत. ते श्लोक व रघुवंशांतील इतर उतारे शिकवितांना असा अनुभव आहे कीं, संदर्भाच्या अभावीं विद्यार्थ्यांस ते नीटसे कळत नाहींत. प्रत्येक श्लोकाचा संदर्भ सांगूं म्हटलें तर शिक्षकांस तितका वेळ नसतो. ह्या दृष्टीनें प्रस्तुत पुस्तकाचा आंग्ल पाठशाळांतील व संस्कृत पाठशाळांतील विद्यार्थ्यांस व शिक्षकांस बराच उपयोग होईल आणि विद्यार्थ्यांस मराठी भाषेच्या द्वारा कथेची गोडी लागल्यावर मूळ संस्कृत ग्रंथ वाचण्याकडे त्यांच्या मनाची प्रवृत्ति होऊन त्यांतील श्लोक त्यांस सहज लावतां येतील अशी मला अपेक्षा आहे. तसेंच गोष्टीवेल्हाळ मराठी प्रौढ वाचकांसहि ‘ रघूची ’ ओळख होईल. संस्कृतज्ञांमध्येंहि ज्यांनीं हें महाकाव्य साद्यन्त वाचिलें नाहीं असे पुष्कळ लोक आढळतात; त्यांनाहि ह्या उत्कृष्ट प्रतीच्या महाकाव्याचा थोड्या अवधींत व अल्प श्रमांत संपूर्ण परिचय करून घेतां येईल. भाषांतर वाचण्याकडे फारच थोड्या वाचकांची प्रवृत्ति होते; शिवाय भाषांतर वाचून मूळ कृतीची आवड उत्पन्न होतेच असें नाहीं. म्हणून प्रस्तुत पुस्तकासारखे आटोपशीर ग्रंथ लिहूनच संस्कृत ललितवाङ्मयाचें भांडार मराठींत आणून रिचविलें पाहिजे असें जें अनेक विद्वानांचें मत आहे तें

---

‘माननीयांचा अपमान केल्यानें कोणाच्याहि कल्याणास प्रतिबंध होतो.’ याला ‘बीज’ असें म्हणतां येईल. विषयदर्पदर्पित पुरुषांचा आपल्या सर्व कृतींमध्यें कालिदासानें जोराचा निषेध केला आहे. शाकुन्तलांतहि दुष्यन्तस्मरणशालिनी शकुन्तला अशीच आपत्ति पावलेली आहे. कार्यनिर्वाहविव्हल मदन पार्वतीपरमेश्वर एकान्तांत असतां आविर्भूत झाला. त्यामुळें सुघटितप्राय अशा सुरकार्याचा मदनाच्या द्वारें नाश होऊन पार्वतीला ईश्वरप्राप्तीस्तव ‘ पुनश्च हरिः ओम् ’ करण्याचा प्रसंग आला. त्याचप्रमाणें पूज्यपूजाव्यतिक्रमाबद्दलच यक्षाला शासन मिळालें आहे. ( मेघदूत काव्याची सबंध उभारणीच या एका तत्त्वावर आहे. मेघहि पूज्य अशा भूधरांचा पूजाव्यतिक्रम करीत असतो म्हणून त्यास वरचेवर विद्युद्विप्रयोग भोगावा लागतो ) स्वर्गीय उर्वशीशीं अस्वर्गीय असें पुरूरव्याचें वर्तन उर्वशीविप्रलंभाला कारणीभूत झालेलें कालिदासानें दाखविलें आहे.

यथार्थ होय. रघुवंशाचें मराठी सटीक भाषांतर करण्याचा पहिला प्रयत्न म्हणजे १८८४–८६ सालचा 'काव्यार्थप्रकाश' मासिकाचा होय. पण त्याची मजल पांचव्या सर्गापलीकडे जाण्यापूर्वीच तें विराम पावलें. कै. गणेशशास्त्री लेले यांनीं १८९३ सालीं समग्र रघुवंशाचें मराठींत पद्यमय भाषांतर केलें तें आज कित्येक वर्षें दुर्मिळ झालें आहे.

संस्कृत कवींचीं नाट्यकथानकें व कादंबरीकथा ह्या पूर्वींच्या पुस्तकांप्रमाणेंच ह्या पुस्तकाचें सामान्य स्वरूप व धोरण राखिलें आहे. यांतहि मुळांतलें स्वारस्य व सौंदर्य न जाऊं देतां व फार संक्षेपहि न करितां शक्य तोंवर कालिदासाच्या शब्दांतच कथा लिहिल्या आहेत. त्या मुळाशीं ताडून पाहण्यास वाचकांस सुकर जावें म्हणून अनुक्रमणिकेंत त्या त्या सर्गांचा श्लोकांसहित निर्देश केला आहे. पूर्वोक्त दोन पुस्तकांप्रमाणेंच **रघुवंशकथेचाहि मराठी अभ्यास पुस्तक म्हणून माध्यमिक शाळांच्या उच्चवर्गांकरितां उपयोग करितां येण्याजोगा आहे.**

'उपमा कालिदासस्य' हें वचन सुप्रसिद्ध आहे. रूपक, दृष्टान्त, उत्प्रेक्षा, निदर्शना इत्यादि बाकीचे अलंकार उपमेचेच निरनिराळे प्रकार असून उपमा हीच बाकीच्या सर्व अलंकारांची जननी होय असें म्हटलें तरी शोभेल. कालिदासाचें उपमानक्षेत्र फारच व्यापक असून सर्वशास्त्रांचा त्यानें परामर्ष घेतला आहे हें संस्कृतज्ञांस सांगावयास नको. कांहीं कांहीं उपमा संस्कृतांत सुश्लिष्ट दिसतात. प्राकृतांत त्या तशा दिसतीलच असें नाहीं. किंबहुना मराठी वाचकांस त्यांचें सहज आकलन होईल असेंहि नाहीं. उ० सर्ग १, ३१ (तस्य) पत्नी सुदक्षिणेत्यासीद्ध्वरस्येव दक्षिणा । ; सर्ग २, २ मार्गं मनुष्येश्वरधर्मपत्नी श्रुतेरिवार्थं स्मृतिरन्वगच्छत् । ; सर्ग १५, ९ रामादेशादनुगता सेना तस्यार्थसिद्धये । पश्चादध्ययनार्थस्य धातोरधिरिवाभवत् । एतावता कथेच्या ओघांत बसतील, मराठीला साजतील, व कथासूत्रांत तुटक व अधांत्रीं दिसणार नाहींत असेच अलंकार 'रघुवंशकथेंत' आणिले आहेत. मराठींत प्रचलित असलेले मुळांतील संस्कृत शब्द शक्य तोंवर कायम ठेविले असून ज्यांनीं रघुवंश वाचिला आहे त्यांना ह्या कथा वाचतांना मूळ संस्कृत श्लोकांचें सहज स्मरण झाल्याखेरीज राहणार नाहीं. त्यांच्यासाठीं व रघुवंशाचा अभ्यास करणाऱ्या संस्कृत विद्यार्थ्यांसाठीं तळटीपांतून संस्कृत सुभाषितें दिलीं असून अखेरीस तीं सर्व एकत्रित करून दिलीं आहेत,

कालिदासकालीन भारतवर्षाचा नकाशा यथास्थळीं जोडिला आहे. त्यावरून चवथ्या सर्गांत वर्णिलेला रघूचा दिग्विजयाचा मार्ग कसकसा होता तो कळून येईल आणि इतरत्र उल्लेखिलेल्या नद्या, पर्वत व देश ह्यांचेंहि ज्ञान होईल.

१९१४ सालीं कॉलेजमध्यें असतांना मी समग्र रघुवंश वाचला. तेव्हांपासून रघुवंशाच्या कथा मराठींत उतराव्या असें माझ्या मनांत घोळत होतें. ती माझी इच्छा आज फळास येऊन, सुप्रसिद्ध भारत-गौरव-ग्रंथमालेंतून माझी कृति प्रकाशांत येत आहे हा ' स एष शर्करायोगः पयसः समपद्यत ' असाच योग मी समजतों.

या पुस्तकाच्या लेखनाच्या प्रारंभापासून तों तें छापून बाहेर पडेपर्यंत जर कोणाचें विशेष साहाय्य झालें असेल तर तें माझे गुरुतुल्य मित्र श्री. केशव लक्ष्मण ओगले, बी. ए., यांचेंच होय. त्यांची विद्वत्ता, रसिकता व चिकित्सकता यांची साक्ष त्यांनीं लिहिलेल्या उपोद्‌घातावरून सहज पटणारी आहे. कालिदासाच्या आणि विशेषतः रघुवंशाच्या अभ्यासकास त्याचा फार उपयोग होईल. संस्कृत-प्रवेशकर्ते श्री. रा. दा. देसाई, बी. ए., सोलापूरचे प्रो. गो. प. पटवर्धन, एम. ए., श्री. ह. वा. पावसकर, एम्. ए., व श्री. द. ना. पेंढारकर, बी. ए., यांनीं स्नेहभावानें केलेल्या मार्मिक सूचनांबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें. माझे कनिष्ठबंधु चि. श्री. शं. नवरे, बी. ए., यांचाहि या संबंधांत नामनिर्देश करण्यास मला विसरतां कामा नये.

शेवटीं प्रो. रामचन्द्र कृष्ण लागू, एम्.ए. व मननामोदकर्ते श्री. माधव गोविंद भिडे यांनीं मला वारंवार प्रोत्साहन देऊन व रघुवंशविषयक चर्चा करून मला उपकृत केलें त्याबद्दल श्रीरामचंद्र व श्रीमाधव यांस वंदन करून मी ही प्रस्तावना पुरी करतों.

त्रिपुरी पौर्णिमा १८५५ नीळकंठ शंकर नवरे

# उपोद्घात

—:०:—

[ १ व्यक्तिगत वृत्त; २ पंचमहाकाव्यें व रघुवंश; ३ महाकाव्यदृष्ट्या विचार; ४ रघुवंशाचें स्वरूप; ५ रघुवंशावरून समजणारें कालिदासाचें वृत्त; ६ कालिदासाचें उपास्य दैवत; ७ कालिदासाची विद्वत्ता; ८ कालिदासाचें ललितकलापटुत्व; ९ कालिदासाचे शिक्षणविषयक विचार; १० सामाजिक व धार्मिक; ११ कालिदासाचें वर्णनकौशल्य; १२ कालिदासाची कोटिप्रियता; १३ कालिदासाची विनोदप्रियता; १४ कालिदासाचें भौगोलिक ज्ञान; १५ रघुवंशांतील कांहीं शंकास्थलें; १६ रघुकुलाचा वंशवृक्ष ]

## १ व्यक्तिगत वृत्त

रसिकांचें कौतुकस्थान अशा कविताकामिनीचा विलासभूत जो कविकुलगुरु कालिदास त्याच्या संबंधानें व्यक्तिदृष्ट्या कांहींच ज्ञान कोणाला असूं नये ही मोठ्या दुःखाची गोष्ट होय. मालविकाग्निमित्र, विक्रमोर्वशीय आणि शाकुन्तल या उत्तरोत्तर अधिक रमणीय होत गेलेल्या नाटकांचा व कुमारसंभव, रघुवंश आणि मेघदूत या तशाच प्रकारच्या काव्यांचा कर्ता याहून या कविश्रेष्ठासंबंधानें अधिक माहिती कोणतीच मिळत नाहीं. फार काय पण तो कोणत्या ठिकाणीं वास करीत होता व केव्हां होऊन गेला या गोष्टीहि अज्ञातच आहेत. त्यानें रचिलेल्या काव्यनाटकादि ग्रंथांतील उल्लेखांवरून त्याची जन्मभूमि, त्याचा काळ, त्याची कुलपरंपरा इत्यादि बाबतींत कांहीं एक निश्चितपणें कळून येण्यासारखें नाहीं. त्यावरून एवढेंच समजण्यासारखें आहे कीं मालविकाग्निमित्र, विक्रमोर्वशीय व शाकुन्तल हीं नाटकें व कुमारसंभव, रघुवंश आणि मेघदूत हीं काव्यें त्याचींच असलीं पाहिजेत. ऋतुसंहार म्हणून षड्ऋतुवर्णनात्मक काव्य त्याच्या नांवावर प्रसिद्ध आहे, पण तें त्याचेंच आहे असें निश्चितपणें म्हणतां येत नाहीं. तें दुसऱ्या कोणातरी कालिदासाचें असावें. कालिदास व राजा भोज यांच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या गोष्टींतील कालिदासहि शाकुन्तलरघुवंशादिकांचा कर्ता जो कविकुलगुरु ालिदास तो नव्हे.

रघुवंशादिकांचा कर्ता कालिदास इ. स. पूर्वीच्या पहिल्या शतकांत होऊन गेला असावा असें कित्येक विद्वानांचें मत असून दुसरे कित्येक तो इ. सनाच्या चवथ्या किंवा सहाव्या शतकांत झाला असावा असें म्हणतात. या पलीकडे निश्चित असें त्याच्या काळासंबंधानें कांहीं सांगतां येत नाहीं. तो मूळचा काश्मीरचा राहाणारा असून पुढें माळव्यांत उज्जयिनी येथें कोणा 'विक्रमादित्य' पदवीशाली राजाच्या आश्रयास आला असावा असें कांहीं पंडितांचें अनुमान आहे. धर्मदृष्टया तो वैदिक धर्मानुयायी असून उपासना दृष्टीनें उदार शैव असावा असें दिसतें. वेदांतादि दर्शनें, व्याकरणज्योतिषादि शास्त्रें, साहित्यसंगीतचित्रासारख्या ललितकला व विद्या यांत तो प्रवीण असून भारतरामायणादि इतिहास पुराणांशींहि त्याचा चांगला परिचय होता असें त्याच्या ग्रंथांवरून म्हणावें लागतें. एकट्या रघुवंशाचें निरीक्षण केलें तरी त्या विषयींच्या या व्यक्तिगत अनुमानांना थोडा बहुत आधार मिळण्यासारखा आहे.

## २ पंचमहाकाव्यें व रघुवंश

कालिदासकृत रघुवंशाला संस्कृतांतील प्रसिद्ध अशा पंचमहाकाव्यांत आद्य स्थान मिळालेलें आहे. १ रघुवंश, २ कुमारसंभव, ३ भारविकृत किरातार्जुनीय, ४ माघकृत शिशुपालवध व ५ श्रीहर्षकृत नैषधीयचरित हींच काव्यें पंचमहाकाव्यें म्हणून थोड्या वर्षांपूर्वीपर्यंत विशेषतः प्रसिद्ध होतीं. पण आतां बुद्धचरित, विक्रमांकदेवचरित यांसारखीं अनेक काव्यें उपलब्ध झालेलीं आहेत. तथापि रघुवंशादिकांचें पंचमहाकाव्यांचें स्थान कोणीं पटकाविलेलें नाहीं. संस्कृत साहित्य शास्त्रांत महाकाव्याची जी व्याख्या आहे तिच्याशीं जुळतील अशींच हीं काव्यें आहेत. पण त्यांतल्या त्यांत त्या व्याख्येला धरून अशीं यांपैकीं किरात, शिशुपालवध व नैषधीयचरित हींच होत. कालिदासाचीं काव्यें ती व्याख्या समोर ठेवून लिहिलेलीं आहेत असें दिसत नाहीं. उलट कालिदासादिकांसारख्या महाकवींच्या काव्यावरून साहित्यशास्त्रकारांनीं काव्याची ध्येयरूपकल्पना बसविली व तदनुसार त्यांनीं केलेल्या महाकाव्याच्या व्याख्येशीं जुळतील अशीं काव्यें पुढील कवींनीं केलीं.

किरातार्जुनीय, शिशुपालवध इत्यादि महाकाव्यें पाहिल्यास तीं दंडीच्या महाकाव्याच्या व्याख्येशीं कशीं तंतोतंत जुळतात हें दिसून येतें. कालिदासाचा कालनिर्णय करितांना रघुवंशाचें स्वरूप व दंडीची व्याख्या यांचा विचार केल्यास

दोष येत नाहीं. जीं अंगें असतील तीं काव्यमर्मज्ञांचें समाधान करणारीं असलीं म्हणजे झालें, असेंहि दंडीनें म्हटलें आहे :—न्यूनमप्यत्र यैः कैश्चिदंगैः काव्यं न दुष्यति । यद्युपात्तेषु संपत्तिराराधयति तद्विदः । या ज्या महाकाव्याच्या दोन व्याख्या सांगितल्या त्यांत सांगितलेल्या बऱ्याच गोष्टी रघुवंशांत दृष्टीस पडतात. प्रथम रघुवंश सर्गबन्ध आहे. दुसरें त्याच्या प्रतिसर्गाच्या शेवटीं निराळ्या वृत्तांत कांहीं श्लोक आले आहेत. तिसरें त्याचा आरंभ शिवपार्वतींना नमस्कारपूर्वक झाला आहे. चवथें त्यांत नगर ( सर्ग १६ ), समुद्र, पर्वत, ( सर्ग १३ ), ऋतु ( सर्ग ४, ९ ), जलक्रीडा ( सर्ग १६ ), मधुपानादि ( सर्ग ९ ), विवाह ( सर्ग ७, १६ ), सैन्याचा तळ ( सर्ग ५ ), युद्धें ( सर्ग ४ व ७ ), इत्यादिकांचीं सरस वर्णनें आहेत. पांचवें त्यांतील नायक बहुतेक चतुर व उदात्त आहेत. सहावें त्यांत श्रृंगारादि रसांचा परिपोष केलेला आहे. ( सर्ग ९ श्रृंगार, सर्ग ८ करुण, इ. ) थोडक्यांत सांगावयाचें तर महाकाव्याला प्राचीन व्याख्येप्रमाणें अवश्य अशा साऱ्या गोष्टी त्यांत आल्या आहेत.

दंडीभामहांनंतर सुमारें ८ शें वर्षांनीं होऊन गेलेल्या साहित्यदर्पणकारानें आपल्या ग्रंथांत महाकाव्याची जी व्याख्या दिली आहे तींत प्राचीन व्याख्येचा अनुवाद करून आणखीहि कांहीं गोष्टींचा अंतर्भाव केलेला आहे. उदाहरणार्थ महाकाव्याचा नायक एकच असून ( तत्रैको नायकः ) तो धीरोदात्त असावा, एकाद्या सर्गांत अनेक वृत्तांतील श्लोक असावे ( नानावृत्तमयः क्वापि सर्गः कश्चन दृश्यते ), एका सर्गाच्या शेवटीं पुढील सर्गांतील विषय सूचित केलेला असावा (सर्गान्ते भाविसर्गस्य कथायाः सूचनं भवेत् ), इत्यादि गोष्टी साहित्यदर्पणांत अधिक सांगितल्या आहेत व त्या रघुवंशांत बहुतेक आढळतात. किरात व शिशुपालवध हीं काव्यें मात्र या शेवटच्या व्याख्येशीं तंतोतंत जुळतात. रघुवंशांत अनेक नायक आले आहेत. त्यांतील दिलीप, रघु, अज, राम, कुश, अतिथि इत्यादि बहुतेक धीरोदात्त असून अग्निवर्णांत मात्र तो गुण नाहीं. तसेंच रघुवंशाच्या एका सर्गांत म्हणजे पांचव्यांत नानावृत्तें योजिलेलीं आहेत, व बऱ्याच सर्गांच्या शेवटीं पुढील सर्गाचा विषय सूचित केलेला आहे. दंडीनें म्हटल्याप्रमाणें महाकाव्याच्या व्याख्येंतील साऱ्या गोष्टी कदाचित् रघुवंशांत आल्या नसल्या तरी कालिदासानें ज्या गोष्टी वर्णिलेल्या आहेत त्या काव्यमर्मज्ञांचें आराधन करणाऱ्याच असल्यामुळें, नसलेल्या गोष्टींमुळें रघुवंशाला कोणत्याहि रीतीनें न्यूनत्व

आलेलें नसून तो आज शेंकडों वर्षें संस्कृत महाकाव्यांत वरिष्ठ स्थान पटकावून बसला आहे.

## ४ रघुवंशाचें स्वरूप

रघुवंश काव्याचे एकोणीस सर्ग असून श्लोकसंख्या १५६६ आहे. वर दिलेल्या महाकाव्याच्या व्याख्येंत सांगितल्याप्रमाणें रघुवंशाची कथा जुन्या इतिहासावरून घेतलेली आहे. हें ' अथवा कृतवाग्द्वारे वंशेऽस्मिन् पूर्वसूरिभिः। मणौ वज्रसमुत्कीर्णे सूत्रस्येवास्ति मे गतिः '। (१,४) या त्यांतील श्लोकावरून उघड होतें. रघुवंशाच्या नांवावरून प्रथमदर्शनींच हे पूर्व सूरि म्हणजे वाल्मीकादि असले पाहिजेत असें उघड दिसतें. पण वाल्मीकि रामायण व रघुवंश यांतील कथांत कांहीं सर्गांपुरतेंच म्हणजे १० ते १५ पर्यंतच विशेष साम्य आहे. इतर सर्गांतील कथा कालिदासानें अर्थात् दुसऱ्या कोठून तरी घेतलेली आहे. कालिदासानें सविस्तर वर्णिलेल्या दिलीप, रघु, व अज यांच्या कथा रामायणांत नाहींत; तशाच लव व कुश यांच्या नंतरच्याहि नाहींत. प्रस्तुत ग्रंथांत रघुवंशाची कालिदासकृत सारी कथाच साररूपानें दिली असल्यामुळें मूळ संस्कृत ग्रंथाचें याहून अधिक वर्णन देण्याचें कारण नाहीं.

## ५ रघुवंशावरून समजणारें कालिदासाचें वृत्त

पूर्वी सांगितलेंच आहे कीं कालिदासाच्या ग्रंथावरून त्याच्याविषयींचें स्पष्ट असें वृत्त कांहीं समजण्यासारखें नाहीं. तरी तसा अनुमानिक प्रयत्न कित्येकांनीं केला आहे. रघुवंशाच्या चवथ्या सर्गांत रघूच्या दिग्विजयाचें वर्णन करितांना ' विनीताध्वश्रमास्तस्य सिन्धुतीरविचेष्टनैः। दुधुवुर्वाजिनः स्कन्धान् लग्नकुङ्कुमकेसरान् ' म्हणजे त्या रघूच्या घोड्यांनीं सिंधुनदीच्या तीरावर लोळून वाटेनें झालेल्या श्रमाचा परिहार केल्यावर केशरांतील फुलांच्या तंतूंनीं माखलेले आपले खांदे झडझडविले ' असें कालिदासानें म्हटलें आहे. केशरांच्या फुलांचें असें वर्णन इतरत्र कोठें आढळत नाहीं, यावरून तें वर्णन करणारा कालिदास केशराचीं फुलें पाहिलेला काश्मीरचा रहिवाशी असला पाहिजे असें अनुमान कांहीं विद्वानांनीं केलें आहे. पण अशाच प्रकारच्या दुसऱ्या एका वर्णनावरून तो कोंकणचा रहिवाशी असावा असेंहि अनुमान करितां येईल. तें वचन असें—' कृष्यां दहन्नपि खलु क्षितिमिन्धनेद्धः। बीजप्ररोहजननीं ज्वलनः करोति ' म्हणजे ' शेती जमीन

भाजून टाकणारा असाहि इन्धनानें प्रज्वलित झालेला अग्नि त्या भूमीला बीं उगविण्यास समर्थच करितो.' जमीन भाजून तींत बीं पेरण्याची पद्धत कोंकणांतच विशेषतः असल्यामुळें असलें सूक्ष्म वर्णन करणारा कालिदास कोंकणस्थ असला पाहिजे असें अनुमान केल्यास तेंहि वावगें होणार नाहीं. तात्पर्य, असल्या वचनांवरून निश्चित कांहीं समजणें शक्य नाहीं. कालिदासानें रघुवंशाच्या चवथ्या सर्गांत, त्याचप्रमाणें पुढें ७ व १४ व्या सर्गांत भरतखंडांतील अनेक देशांतील स्थितीचीं जीं सूक्ष्म वर्णनें केलीं आहेत, त्यांवरून निश्चित अनुमान एवढेंच काढतां येण्यासारखें आहे कीं, त्यानें या सर्व भागांतून कांहीं तरी निमित्तानें प्रवास करून तेथील परिस्थितीचें बारकाईनें निरीक्षण केलें होतें. भाताचें रोप उपटून पुनः लाविल्यानें त्याचें पीक चांगलें येतें, हें 'आपादपद्मप्रणताः कलमा इव ते रघुम् । फलैःसंवर्धयामासुः उत्खातप्रतिरोपिताः' (४,३७) हें बंगालवर्णनांतील निरीक्षण दुसरें काय दाखविणार ?

## ६ कालिदासाचें उपास्य दैवत

कालिदास शिवोपासक असावा असें वाटतें. त्यानें आपल्या सर्व नाटकांच्या नांद्यांत शिवाचें वर्णन केलें असून रघुवंशाचाहि आरंभ पार्वतीपरमेश्वरांना वंदन करून केलेला आहे. मेघदूतांतील शंकराचें व त्याच्या सर्व परिवाराचें सविस्तर वर्णन तसेंच कुमारसंभवांतील हिमालयवर्णन व शिवस्तुति ह्यांवरूनहि तेंच अनुमान होतें. विशेषतः 'ममापि च क्षपयतु नीललोहितः । पुनर्भवं परिगतशक्तिरात्मभूः ॥' या शाकुन्तलांतील भरतवाक्यांतर्गत 'ममापि' हे शब्द या बाबतींत विशेष सूचक आहेत. पण तो शैव असला तरी एककल्ली नव्हता हें रघुवंशांतील त्याच्या विष्णुस्तुतीवरून उघड दिसतें ( सर्ग १० पहा ).

बहुधाप्यागमैर्भिन्नाः पन्थानः सिद्धिहेतवः ।
त्वय्येव निपतन्त्योघा जाह्नवीया इवार्णवे । ( १०,२६ )

हा त्याचा श्लोक, "आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरम् । सर्वदेवनमस्कारः केशवं प्रतिगच्छति" या प्रसिद्ध श्लोकाची आठवण करून देणारा असून त्याची उपासनांविषयक उदारबुद्धि सिद्ध करतो.

## ७ कालिदासाची विद्वत्ता

कालिदासाचा व्याकरण, ज्योतिष इत्यादि शास्त्रांशीं, मीमांसा वेदांतादि दर्शनाशीं, तसाच भारतादि पुराणइतिहासाशीं चांगला परिचय असला पाहिजे. कुमार-

संभव व रघुवंश हीं काव्यें व शाकुन्तल नाटक यांचे विषयच या इतिहासपुराणांतून घेतलेले आहेत. 'पश्चादध्ययनार्थस्य धातोरधिरिवाभवत्' (रघु. १५-९) 'पत्नी सुदक्षिणेत्यासीदध्वरस्येव दक्षिणा' ( १-३१ ) 'अथात्मनः शब्दगुणं गुणज्ञः पदं विमानेन विगाहमानः ( १३-१ ) इत्यादि उल्लेखांवरून त्याचा व्याकरणमीमांसान्याय इत्यादि शास्त्रांशीं असलेला परिचय दिसून येतो. 'दुदोह गां स यज्ञाय सस्याय मघवा दिवम् । संपद्विनिमयेनोभौ दधतुर्भुवनद्वयम्' ( १,२६ ) अनावाप्तमवाप्तव्यं न ते किञ्चन विद्यते । लोकानुग्रह एवैको हेतुस्ते जन्मकर्मणोः ( १०-३१ ), त्वय्यावेशितचित्तानां त्वत्समर्पितकर्मणाम् । गतिस्त्वं वीतरागाणां अभूयःसन्निवृत्तये । ( १०-२७ ) धर्मसंरक्षणार्थैव प्रवृत्तिर्भुवि शार्ङ्गिणः (१५,४), इत्यादि रघुवंशांतील श्लोक 'देवान् भावयतानेन ते देवा भावयन्तु वः । परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ' ( ३-१० ) 'न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन । नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ( ३,२२ ) 'मय्यावेशितचेतसाम्' ( १२,७ ) मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्य ( ३-३० ), धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ( ४,८ ) इत्यादि गीतावचनांचें स्मरण करून देतात. 'नृपस्य वर्णाश्रमपालनं यत् स एव धर्मो मनुना प्रणीतः ( १४,६७ ) या ओळींत त्यानें मनुस्मृतीचा धर्मशास्त्रकार म्हणून उल्लेख केला आहे. चाणक्याच्या अर्थशास्त्राशींहि कालिदासाचा परिचय होता, हें त्याच्या १७ व्या सर्गांतील अतिथिराजाच्या वर्णनावरून दिसून येतें. वेदांना पूज्य मानीत असतांहि कालिदास ऋषींना मंत्रद्रष्टे न म्हणतां मंत्रकर्ते म्हणतो हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे-'तव मंत्रकृतो मन्त्रैर्दूरात्प्रशमितारिभिः ( १-६१ ), अप्यग्रणीर्मन्त्रकृतां ऋषीणाम् ( ५-४ ), सखा दशरथस्यापि जनकस्य च मंत्रकृत् ( १५-३१ ) यांत वसिष्ठ, वरतन्तु व वाल्मीकि यांना त्यानें मंत्रकृत् म्हटलें आहे.

## ८ कालिदासाचें ललितकलापटुत्व

कालिदास मोठा ललितकलाभिज्ञ होता. ललितकला हा शब्दहि त्याचाच असून 'प्रियशिष्या ललिते कलाविधौ' ( रघु. ८-६७) या इंदुमतीच्या अजकृत वर्णनांत त्यानें तो योजिला आहे. त्याचें संगीत व चित्रकला या विषयांचें ज्ञान सूक्ष्म असून तद्विषयक उल्लेख त्याच्या सर्वग्रंथभर विखुरलेले आहेत. नाट्यशास्त्र-

कार भरताचा त्यानें उल्लेख केलेला असून ( विक्रमोर्वशीय–‘ मुनिना भरतेन यः प्रयुक्तः’ इत्यादि ) साहित्यशास्त्राशीं त्यानें चांगला परिचय दाखविला आहे. उपमा-दृष्टान्तादि सादृश्यविषयक अलंकार त्यानें अत्यंत मार्मिकपणें योजिलेले असून त्यांच्या प्रचंड संख्येवरून ‘ उपमा कालिदासस्य ’ असें म्हणण्याची प्रथा पडली आहे. अर्थान्तरन्यास हाहि त्याचा आवडता अलंकार दिसतो. रघुवंशाचा पहिलाच सर्ग घेतला तर त्याला “ वागर्थाविवसंपृक्तौ ” अशा सुंदर उपमेनेंच आरंभ केलेला आढळतो. बहुतेक श्लोकांमध्यें कांहींना कांहीं अलंकार आहे. दुसऱ्या श्लोकांत सूर्यवंशवर्णन माझ्यासारख्या अल्पमतीनें करणें म्हणजे ‘ होड-क्याच्या साहाय्यानें अफाट समुद्र ओलांडण्याचा प्रयत्न करणें होय, ’ अशी निद-र्शना आहे. तिसऱ्यांत ठेंगू माणसानें उंच झाडाचें फळ काढण्यासाठीं हात उंच करणें, चवथ्यांत छिद्र पाडलेल्या मण्यांत दोरा सुलभपणें ओवतां येणें, अशा गोष्टी उपमेसाठीं घेतल्या आहेत. ‘ हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकाऽपि वा ’ ‘ सहस्रगुणमुत्स्रष्टुमादत्तेहि रसं रविः,’ इत्यादि दृष्टांतहि फार मार्मिकपणें योजि-लेले दिसतात ( १, १० ते १८ ). आकारसदृशप्रज्ञः प्रज्ञयासदृशागमः । आगमैः सदृशारम्भ आरंभसदृशोदयः असा सार अलंकार, ततो मृगेन्द्रस्य मृगेन्द्रगामी वधाय वध्यस्य शरं शरण्यः । ( २, ३० ) असे अनुप्रास, नवव्या सर्गांत प्रति-श्लोकाच्या चतुर्थ चरणांतील ‘ यमवतामवतां च धुरि स्थितः ( ९–१ ), श्रमनुदं मनुदंडधरान्वयम् ’ (९–३) इत्यादि यमकें, इत्यादिकांवरून त्याची शब्दालंकार-प्रियताहि व्यक्त होते.

## ९ कालिदासाचे शिक्षणविषयक विचार

विद्येची उत्तम आराधना केली असतां ज्याप्रमाणें ती ज्ञान व नम्रता या जोड-गुणांना प्रसवते, त्याप्रमाणें सुमित्रेनें लक्ष्मण व शत्रुघ्न या जुळ्या मुलांना जन्म दिला (सुतौ लक्ष्मणशत्रुघ्नौ सुमित्रा सुषुवे यमौ। सम्यगाराधिता विद्या प्रबोधविनयाविव ॥ १०, ७१). या कथनांत कालिदासानें शिक्षणाचें ध्येय उत्तम रीतीनें दाखविलें आहे. त्याचप्रमाणें रघूचें शिक्षण, कौत्साचें शिक्षण, अजाचें शिक्षण, रामादि बंधूंचें शिक्षण, कुशलवांचें शिक्षण, सुदर्शन नांवाच्या बालराजाचें शिक्षण, इत्यादि प्रकरणांत धूळ-पाटीपासून वेदविद्या व धनुर्विद्या यांचें शिक्षण कसें देण्यांत येत असे, या संबंधाचे विविध उल्लेख आले आहेत. ‘ न्यस्ताक्षरामक्षरभूमिकायां कात्स्न्येंन गृह्णाति लिपिं न यावत् ( १८, ४६ ), लिपेर्यथावद्ग्रहणेन वाङ्मयं नदीमुखेनेव समुद्रमाविशत्

( ३,२८ ) अथोपनीतं विधिवद्विपश्चितः विनिन्युरेनं गुरवो गुरुप्रियम् ( ३,२९ ), क्रियाहि वस्तूपहिता प्रसीदति ( ३, २९ ), धियः समग्रैः स गुणैरुदारधीः क्रमाच्चतस्रश्चतुर्णवोपमाः। ततार विद्याः ( ३, ३० ), त्वचं स मेध्यां परिधाय रौरवीमशिक्षितास्त्रं पितुरेव मंत्रवत् ( ३, ३१ ), यतस्त्वया ज्ञानमशेषमाप्तं लोकेन चैतन्यमिवोष्णरश्मेः (५,४), समाप्तविद्येन मया महर्षिर्विज्ञापितोऽभूद्गुरुदक्षिणायै। स मे चिरायास्खलितोपचारां तां भक्तिमेवागणयत्पुरस्तात् ( ५, २० ), वित्तस्य विद्यापरिसंख्यया मे कोटीश्चतस्रो दश चाहरेति। ( ५,२१ ), उपात्तविद्यं विधिवद्गुरुभ्यः ( ५, ३८ ), स्वाभाविकं विनीतत्वं तेषां विनयकर्मणा। मुमूर्च्छ सहजं तेजः हविषेव हविर्भुजाम्। ( १०, ७९ ), साङ्गं च वेदमध्याप्य किंचिदुत्क्रान्तशैशवौ। स्वकृतिं गापयामास कविप्रथमपद्धतिम्॥ ( १५, ३३ ) इत्यादि वचनांवरून तत्कालीन शिक्षणाचें ध्येय, सामान्य शिक्षणाची पद्धत, त्याचा क्रम, इत्यादि गोष्टी कळून येण्यासारख्या आहेत. 'तत्त्वार्थेन नुदंस्तमः' या अतिथि राजाच्या वर्णनावरून सामान्य लोकांत ज्ञानप्रसार करण्याची योजनासुद्धां दिसून येते. 'प्रजानां विनयाधानाद्रक्षणाद्भरणादपि' या दिलीपाच्या वर्णनांत कालिदासानें प्रजाशिक्षण हें राजाचें प्रधानकर्तव्य होय असें सुचविलें असून पुढें रामाच्या वर्णनांतहि 'तेनास लोकः पितृमान् विनेत्रा तेनैव शोकापनुदेन पुत्री' ( १४,२३ ), असें म्हणून तोच भाव पुनः व्यक्त केला आहे. याशिवाय शिस्त, शिक्षकाचे गुण, परीक्षक, परीक्षा, स्त्री-शिक्षण, शिक्षणाच्या दृष्टीनें विवाहकाल, चांगले शिष्य, इत्यादि शिक्षणसंबद्ध विषयांवरहि त्यानें आपले विचार प्रकट केले असून ते मालविकाग्निमित्र नाटकांत विशेषतः आढळून येतात.

## १० सामाजिक व धार्मिक

कालिदासाच्या कालीं समाजरचना निश्चित कशी होती हें सांगतां आलें नाहीं, तरी स्थूलमानानें ती चातुर्वर्ण्यात्मक होती असें म्हणावयास हरकत नाहीं. चातुर्वर्ण्यपद्धतीचें रक्षण करणें हें राजाचें कर्तव्य असें मानिलें जाई. वर्णाश्रमाणां पालयिता ( शाकुन्तल, ५,१२ ), वर्णाश्रमावेक्षणजागरूकः ( रघु० १४, ८५ ) म्हणजे वर्ण व आश्रम यांचें पालन करणारा अशीं विशेषणें कालिदासानें राजाला लाविलीं असून 'नृपस्य वर्णाश्रमपालनं यत् स एव धर्मो मनुना प्रणीतः' ( १४, ६७ ) असें राजाचें कर्तव्य मनूनें सांगितल्याचाहि उल्लेख तो करतो. ब्राह्मण व क्षत्रिय यांचींच वर्णनें त्याच्या ग्रंथांत आढळतात. विक्रमोर्वशीय ( नैगमाः सानु-

मन्ताः ) रघुवंश ( १७-६४) इत्यादि ठिकाणीं वैश्यांचे उल्लेख थोडे आढळतात; शूद्रांचेहि एक दोनच असून रामराज्यांत अधर्मानें तप करणाऱ्या शंबूकाचा व शाकुन्तलांतील मासेविक्या कोळ्याचा हे प्रमुख दिसतात.

## ११ कालिदासाचें वर्णनकौशल्य

कालिदासाची वर्णनशैली मनोहर असून कोणतेंहि वर्णन कंटाळवाणें न होईल अशी दक्षता त्यानें घेतलेली आहे. सकृद्दर्शनीं एकाच जातीचीं वर्णनें भिन्नपरिस्थितींत करावीं लागल्यास त्यांत भिन्नता आणण्याकडे त्याचें लक्ष असतें. उदाहरणार्थ त्याचीं आश्रमांचीं वर्णनें घेऊं. एका रघुवंशांतच तीन आश्रमांचीं वर्णनें आलीं आहेत. पहिल्या अध्यायांतील वसिष्ठाश्रमाचें, पांचव्यांतील वरतंतूच्या आश्रमाचें आणि चवदाव्यांतील वाल्मीकीच्या आश्रमाचें. पहिलें वर्णन ४९ पासून ५३ पर्यंतच्या पांच श्लोकांत आलें असून तें सरळ वर्णन म्हणून आहे. पांचव्यांतील वर्णन प्रत्यक्ष वर्णनाच्या रूपानें न येतां कुशलप्रश्नांच्या रूपानें आलें आहे, तर वाल्मिकीच्या आश्रमाचें सीतेला तेथें कसें राहावें हें सांगतांना अप्रत्यक्ष रीतीनें आलें आहे. कालिदासाचीं स्वभाववर्णनेंहि विविध आहेत. दिलीप, रघु, अज, दशरथ, राम, कुश, अतिथि इत्यादि सर्व राजे धीरोदात्त तर खरेच, पण प्रत्येकाचें कांहीं वैशिष्टय आहेच. स्त्रीवर्णनांतहि हाच प्रकार आढळतो. सुदक्षिणा, इंदुमती, कौसल्या, सुमित्रा, कैकेयी, सीता, अग्निवर्णाची राणी इत्यादि स्त्रियांचा पृथक्‌पणा स्पष्ट दिसण्यासारखा आहे. चवथा, सातवा, अकरावा, बारावा इत्यादि सर्गांत युद्धवर्णनें आलीं असून त्या सर्वांत चटकदारपणा राहील इतकाच त्यांचा व्याप ठेविलेला आढळतो. करुणरसवर्णनांतहि हीच त्याची दृष्टि दिसून येते. आठव्या अध्यायांतील अजविलाप व चवदाव्यांतील सीतेचा शोक यांतील भिन्नता उघड आहे.

## १२ कालिदासाची कोटिप्रियता

कालिदासाला कोट्या फार प्रिय दिसतात. सुदक्षिणा, रघु, अज, दशरथ, राम, शत्रुघ्न इत्यादि नांवांवर त्यानें व्युत्पत्तिदृष्ट्या कोट्या केल्या असून अठराव्या सर्गांतील संक्षिप्त राजवर्णनांत तर बहुतेक नांवावर त्यानें कांहीं तरी क्लृप्ति बसविली आहे. उदाहरणार्थ नभ, पुण्डरीक, देवानीक, वशी, अहीनगु, पारियात्र, शिल, उन्नाभ, वज्रणाभ, विश्वसह, हिरण्यनाभ, पुष्य या नांवांचीं समर्थनें करतांना त्यानें लढविलेल्या कोट्या पाहण्यासारख्या आहेत. ( कथा ३२ वी पहा.

# १३ कालिदासाची विनोदप्रियता

कालिदासानें लोकाभिरुचीला अनुसरून शृंगाररसाचाच पुरस्कार मुख्यत्वेंकरून केला असला, तरी इतर रसांना तो अगदींच विसरलेला नाहीं. गौण म्हणून कां होईना, पण हास्यरसान्तर्भूत विनोदाचा आश्रय त्यानें आपल्या ग्रंथांत व विशेषतः नाटकांत केलेला आढळतो. त्याच्या तीन नाटकांपैकीं मालविकाग्निमित्र हें नाटक सामान्य प्रतीचीं माणसें पात्रें म्हणून योजून लिहिलेलें असून त्यांत विनोदाला बरेंच महत्वाचें स्थान मिळालेलें आहे. इतर नाटकांतूनहि तो थोडाथोडा आढळतो. महाकाव्यांत विनोदाला अवसर फारसा नसतोच. तरीहि रघुवंशांत त्यानें प्रसंगोपात्त विनोदाची छटा दाखविली आहे. ' रघुसारख्या थोर राजाच्या वर्णनास हात घालून कवि होण्याची हांव धरणें म्हणजे लहानशा होडींत बसून समुद्राच्या पार जाण्याचें धाडस करणेंच होय' इत्यादि त्याचे रघुवंशांतील प्रास्ताविक विचार विनोदात्मकच होत. विनोदाच्या छटा दुसऱ्या सर्गांत दिलीपसिंह-संवादांत, तशाच पुढें इंदुमतीस्वयंवरवर्णनाच्या ६ व्या सर्गांतील स्वयंवरार्थ जमलेल्या राजांच्या सुनन्दाकृत वर्णनांत आढळून येतात. सिंहाच्या भाषणांतील ' अल्पस्य हेतोर्बहु हातुमिच्छन् विचारमूढः प्रतिभासि मे त्वम् ( २, ४७ ), शक्योऽस्य मन्युर्भवता विनेतुं गा कोटिशः स्पर्शयता घटोघ्नीः ( २, ४९ ), इत्यादि शब्द वाचकामध्यें स्मित उत्पन्न करणारे आहेत. गुरुभक्ति व धेनुभक्ति यांमुळें गंभीरपणें आतुरतेनें बोलणारा दिलीप आणि मायावी खेळ उत्पन्न करून राजाला क्षणभर हतवीर्य बनविल्यावर त्याच्याशीं खुशालपणें व्यवहारचातुर्याचीं व्याख्यानें झोडणारा सिंह, या जोडींतील संवाद वाचकांना विनोदी वाटल्याशिवाय कसा राहील ? काळ्याकुट्ट वर्णाच्या पांड्य राजाला गोरोचनागौर इन्दुमतीनें माळ घालावी असें सांगणारी सुनन्दा जेव्हां 'अन्योन्यशोभापरिवृद्धये वां योगस्तडित्तोयदयोरिवास्तु ।' ( ६, ६५ ) म्हणजे तुमचा जोडा कसा काळा ढग आणि विजेची चमक यांच्या जोड्यासारखा दिसेल, असें वरकरणी म्हणते तेव्हां वाचकाच्या ओंठावर थोडें तरी स्मित चमकलेंच पाहिजे. तसेंच इतर सर्व राजांचें वर्णन झाल्यावर अजराजाशीं येऊन त्यावर इन्दुमतीचें मन जडल्याचें पाहाणारी सुनन्दा तेथून हलूं न इच्छिणाऱ्या इन्दुमतीला 'आर्ये व्रजामोऽन्यतः' ( ६, ८२ ) म्हणजे 'ताई महाराज, पुढें जाऊं चला' असें तिला खिजविण्यासाठीं म्हणते तेव्हांहि इन्दुमतीचा क्रोधाविर्भाव हंसूं आणील असाच आहे.

## १४ कालिदासाचें भौगोलिक ज्ञान

कालिदासाच्या ग्रंथांत भौगोलिक वर्णन परंपरागत पौराणिक आणि प्रत्यक्षदृष्ट असें दोन प्रकारचें आहे. स्वर्ग, पाताल, मेरु इत्यादिकांचें वर्णन पहिल्या वर्गांत मोडत असून रघुराजाच्या दिग्विजयासंबंधानें, इन्दुमतीच्या स्वयंवरासंबंधानें, रामाच्या अश्वमेधासंबंधानें आलेलें भरतखंडांतील अनेक देशांचें वर्णन दुसऱ्या वर्गांत मोडतें. या दुसऱ्या प्रकारच्या म्हणजे वास्तविक वर्णनांत मगध म्हणजे प्रस्तुतचा बहार, उत्तर कोसल म्हणजे अयोध्याप्रांत, अंग, वंग म्हणजे बंगाल, कामरूप म्हणजे आसाम, सुह्म म्हणजे ब्रह्मदेश, कलिंग म्हणजे तैलंगणाचा एक भाग, विदर्भ म्हणजे वऱ्हाड, अवन्ती म्हणजे माळवा, दक्षिणेकडील पांड्य म्हणजे मद्रास इलाख्यांतील तिनवेल्ली व मदुरा, केरल म्हणजे मलबार, अपरान्त म्हणजे कोंकण, पश्चिमेकडील पारसीक म्हणजे इराण, सिन्धु, उत्तरेकडील काम्बोज (तिबेट), काश्मीर इत्यादि देश व त्यांतील नगरें, पर्वत, नद्या, वृक्षविशेष, विशिष्ट चालीरीति, यांचे उल्लेख कालिदासानें केले आहेत. हिमालय, विन्ध्य, महेन्द्र, सह्य, गोवर्धन, आम्रकूट, चित्रकूट, त्रिकूट, मलय, दर्दुर, माल्यवान् इत्यादि पर्वत; गंगा, यमुना, सिन्धु, सरयू, कपिशा, शोण, सिप्रा, रेवा ( नर्मदा ), गोदावरी, तमसा, लौहित्या, कावेरी, मुरला, निर्विन्ध्या, वेत्रवती, इत्यादि नद्या; दण्डकारण्य व त्याजवळील पञ्चवटी, जनस्थान हीं ठिकाणें; अयोध्या, पुष्पपुर म्हणजे पाटणा, उज्जयिनी, माहिष्मती, मथुरा, विदिशा, तक्षशिला, पुष्कलावती, कुशावती, शरावती इत्यादि नगरें व नगऱ्या, यांचीं नांवें कालिदास देतो. हिमालयावरील भूर्ज, कीचक ( बांबू ), नमेरु, सरल इत्यादि वृक्ष, आसामांतील कृष्णचंदन व हत्ती, उज्जयिनीचा महाकाळ, कलिंगांतील तालवृक्षाचीं वनें, पांड्यदेशांतील वेलची, नागवेल, चंदन, तमाल इत्यादि लतावृक्ष, हिमालयांतील मानस व ब्राह्म हीं सरोवरें, दक्षिणेंतील पंपा सरोवर, इराणांतील अश्वसैन्य, काश्मीरांतील केशर, इराणी लोकांच्या दाढ्या, पांड्यराजाचा काळावर्ण, कांबोजांतील म्हणजे तिबेटांतील अक्रोडाचीं झाडें, हिमालयांतील लांब केसांच्या वनगाई इत्यादि, स्थानविशिष्ट अनेक गोष्टी कालिदासानें सांगितल्या आहेत.

## १५ रघुवंशांतील कांहीं शंकास्थलें

कालिदासाचे ग्रंथ समोर घेऊन बसलें असतां, उपरिनिर्दिष्ट विषयांवर लिहावें

अवजानासि मां यस्मादतस्ते न भविष्यति ।
**मत्प्रसूतिमनाराध्य** प्रजेति त्वां शशाप सा ॥
**सुतां तदीयां सुरभेः कृत्वा प्रतिनिधिं** शुचिः ।
आराधय सपत्नीकः **प्रीता कामदुघाहि सा** ॥

सुरभि कामधेनूचा तुला शाप झाला आहे कीं, "माझ्या संततीची आराधना केल्याशिवाय तुला पुत्रप्राप्ति होणार नाहीं." म्हणजे दिलीपाला प्रत्यक्ष सुरभीची आराधना करावयाची नसून तिची मुलगी जी नंदिनी तिचीच करावयाची आहे. असें असतां व ती नंदिनी तेथें असतां सुरभि तेथें नसल्याची अडचण दाखवून तिच्या अभावीं तिच्या मुलीलाच प्रतिनिधि समजून तिची आराधना कर, कारण नंदिनी संतुष्ट झाली म्हणजे ती देखील इष्ट पुरविण्यास समर्थ आहे असली कहाणी वसिष्ठ दिलीपाला सांगतो, हें चमत्कारिक दिसतें. फार मागें काय लिहिलें हें प्रसंगीं विसरून एकादा कवि विसंगतपणा करील, पण जवळ जवळ लागोपाठच्या दोन श्लोकांत आढळणाऱ्या या विसंगतपणाचें समर्थन कसें करावयाचें ?

कालिदासाचें पुराणकथांचें ज्ञानहि फार विस्तृत आहे. कुमारसंभवांत कार्तिकेयाच्या जन्माचें वर्णन करून पुढें तारकासुराचा त्यानें वध केल्याची साग्र कथाहि त्यानें सांगितली आहे. पण तींत किंवा इतरत्र केलेल्या कार्तिकेयाच्या वर्णनांत त्याच्या विवाहाचा संबंध त्यानें दर्शविलेला नाहीं. इतकेंच नव्हे तर विक्रमोर्वशीयांत ( अं. ४, ४१, ) स्कंदानें शाश्वत कुमारव्रत घेऊन गन्धमादन पर्वतावर आश्रम स्थापिल्याचें व तेथें स्त्रियांना सर्वथैव मज्जाव केल्याचेंहि तो सांगतो. तथापि रघुवंशाच्या ७ व्या सर्गाच्या पहिल्या श्लोकांत अजानें इंदुमतीसह केलेल्या विदर्भपुरप्रवेशाला कालिदासानें प्रत्यक्ष देवसेनेसह स्कंदानें केलेल्या पुरप्रवेशाची उपमा दिली आहे.

अथोपयंत्रा सदृशेन युक्तां स्कंदेन साक्षादिव देवसेनाम् ।
स्वसारमादाय विदर्भनाथः पुरप्रवेशाभिमुखो बभूव ।

या श्लोकांत उपयंतृ म्हणजे वर किंवा नवरा मुलगा हा शब्द अजाला व स्कंदाला असा दोघांनाहि लागतो. अर्थात् देवसेना म्हणजे देवांचें सैन्य असा अर्थ नसून देवसेना नामक कोणी देवकन्या स्कंदाची वधूच होय व मल्लिनाथानें तसाच अर्थ दिला आहे. पण सामान्यतः पुराणकथांत स्कंद हा अविवाहित इतकेंच

नव्हे तर स्त्रियांचें दर्शनहि टाळणारा असा प्रसिद्ध आहे व कालिदासालाहि ती गोष्ट संमत आहे. तेव्हां ही देखील प्रसिद्धकथादृष्टया विसंगति दिसते. महाभारताच्या वनपर्वांत अध्याय २२३–२३० यांत देवसेना ही इंद्राची कन्या असून तिनें स्कंदाला वरिलें होतें अशी कथा आहे व तिला उद्देशून कदाचित् कालिदासाची उपमा असेल. पण तेणेंकरून कालिदासाच्या मागची विसंगति सुटत नाहीं.

शंकास्थळांपैकीं आणखी स्थळें म्हणजे 'छाया हि भूमेः शशिनो मलत्वेनारोपिता शुद्धिमतः प्रजाभिः' । ( १४, ४० ) व 'भूयस्ततो रघुपतिर्विलसात्पताकं । अध्यास्त कामगतिसावरजो विमानम् । दोषातनं बुधबृहस्पतियोगदृश्यम् । तारापतिस्तरलविद्युदिवाभ्रवृन्दम् ।' ( १३, ७६ ) हे ज्योतिःशास्त्रविषयक उल्लेख होत. यांतील पहिल्यांत चंद्रावरील डागाचें खरें कारण पृथ्वीची त्यावर पडलेली छाया होय असें म्हटलें आहे. पण छाया म्हणजे काय ? त्या शब्दाचे प्रतिबिंब व सावली असे दोन्ही अर्थ आहेत. कोणताहि अर्थ घेतला तरी चंद्राला जो नित्यकविसंकेतानें शशांक किंवा मृगांक म्हणजे सशाचें चिह्न धारण करणारा हा शब्द लाविला आहे, त्याशीं तो विसंगत आहे; खऱ्या ज्योतिःशास्त्राशीं तर आहेच आहे. पण कालिदासीय ज्योतिषांत चंद्राच्या डागाची उपपत्ति पृथ्वीच्या छायेवर बसविली आहे असें म्हणावें लागतें व तीवरून त्याचा कल्पकपणा दिसून येतो. दुसऱ्या स्थळांत नंदिग्रामाहून अयोध्येला येण्यासाठीं भरत लक्ष्मण व सीता यांसह पुनः विमानावर आरोहण करणाऱ्या रमाचें सुंदर उपमापूर्वक वर्णन आहे. त्यांत बुध व बृहस्पति यांसह चंचलविद्युद्युक्त अशा सायंकालीन अभ्रवृंदावर तारापति चंद्रानें आरोहण करावें, त्याप्रमाणें फडफडणाऱ्या पताकांनीं युक्त अशा, आपण सांगूं तिकडे जाणाऱ्या विमानावर भरतलक्ष्मणांसह सीतापति रामानें आरोहण केलें असें मोठ्या चटकदारपणें सांगितलें आहे. पण ही उपमा काल्पनिक असून प्रत्यक्ष दृश्य अशी वाटत नाहीं. एक तर संध्याकाळीं क्षितिजाजवळ ढग असतांना तेथें बुध दिसणें प्रायः अशक्यच आणि त्यांतहि चंद्र व गुरु यांच्याजवळ तो असेल तर आणखीच कठीण. तीक्ष्णदृष्टीच्या माणसास आकाश अगदीं निरभ्र असेल तरच बुधदर्शन होऊं शकतें. अर्थात् कालिदासाची उपमा चटकदार असली तरी ती काल्पनिक आहे व वस्तुस्थितीला धरून असलेली दिसत नाहीं.

# १६ रघुकुलाचा वंशवृक्ष

कालिदासानें सूर्यवंशांतील दिलीपापूर्वीच्या मनु, इक्ष्वाकु, पुरंजय किंवा ककुत्स्थ, सगर, भगीरथ, या राजांचा उल्लेख केला आहे. पण रघुवंशांत वर्णन करतांना दिलीपापासून अग्निवर्णापर्यंतच्या वंशाचाच वृत्तान्त तो देतो. दिलीपापासूनचा वंशवृक्ष रघुवंशांत पुढीलप्रमाणें आहेः—



२५ ब्रम्हिष्ठ
२६ पुत्र
२७ पुष्य

२८ ध्रुवसन्धि
२९ सुदर्शन
३० अग्निवर्ण

या वंशवृक्षांत व रामायणांत दिलेल्या वंशवृक्षांत पुष्कळ भेद आहे. तो कां असावा ? कालिदासानें रामाची कथा रामायणावरून घेतली असली, तरी इतर रघुवंशीय कथा तशा घेतलेल्या नाहींत, त्याप्रमाणें वंशवृक्षहि त्यानें दुसऱ्या कोणत्या तरी ग्रंथांतून घेतलेला आहे. विष्णुपुराण, भागवतपुराण इत्यादिकांत रघुवंशाची वंशावळ दिलेली आहे व ती कालिदासाच्या वंशावळीशीं रामायणांतील वंशावळीपेक्षां अधिक जुळते; पण सर्वांशीं जुळत नाहीं.

**के. ल. ओगले.**



# अनुक्रमणिका

——:o:——

# रघुवंशकथा



## कथा पहिली

### राजा दिलीप



आद्यकवि महर्षि वाल्मीकींनीं वर्णिलेलें श्रीरामचंद्राचें उदात्त व रम्य चरित्र आबालवृद्ध भारतवासियांस विदित आहे. ज्या वंशांत रामाचा जन्म झाला तो साक्षात् सूर्यापासून उत्पन्न झाला असल्यानें त्यास ' सूर्यवंश ' असें म्हणतात. ह्या वंशांत रामाचा एक पूर्वज रघु नामक राजा इतका पराक्रमी व कीर्तिमान् निघाला कीं, त्याच्यावरून या वंशास ' रघुवंश ' असें नवीन नांव प्राप्त झालें. कविकुलगुरु कालिदासानें ' रघुवंश ' नांवाच्या संस्कृत महाकाव्यांत त्यांतील कांहीं राजांचें फार सुरस वर्णन केलें आहे. त्यांच्याच कथा पुढें दिल्या आहेत.

फार फार पुरातन काळीं सूर्याचा पुत्र जो मनु त्याच्यानंतर कांहीं पिढ्यांनीं दिलीप नांवाचा प्रसिद्ध सम्राट् होऊन गेला. त्याची पेलेदार छाती, भरदार खांदे, पिळदार व दीर्घ बाहु आणि शालवृक्षासारखी उच्च देहयष्टि हीं पाहिलीं म्हणजे असें वाटे कीं, हा मूर्तिमंत क्षात्रधर्मच अवतरला आहे. तो केवळ शरीरानेंच भव्य होता असें नव्हे, तर त्याची बुद्धीहि विशाल असून त्याच्या बाह्य आकृतीस साजेशी होती. बुद्धीप्रमाणें त्याचा शास्त्राभ्यासहि विलक्षण होता. शास्त्राभ्यासाला योग्य असेंच त्याचें आचरण होतें, आणि आचरणानुरूप त्यास फलप्राप्ति होत असे.

त्याची प्रजा मनूनें घालून दिलेल्या नियमांचें अणुमात्र उल्लंघन करीत नसे; ती रुळलेल्या मार्गानें जात असे. सारथी कुशल असला म्हणजे रथचक्राच्या धावा मळलेला मार्ग सोडून काडीभरहि आजूबाजूस जात नाहींत; कां जातील ? सूर्य जसा पृथ्वीवरील जलाचें शोषण करितो व तें सहस्र पटीनें परत देतो,* तद्वत् दिलीप राजा प्रजेच्याच कल्याणा-करितां काय तो करभार घेत असे; आपल्या सुखोपभोगासाठीं नसे. प्रजेला जन्मदातीं मातापितरें निराळीं असलीं तरी शिक्षण, रक्षण, व पोषण यांमुळें दिलीप राजा तिला पित्याप्रमाणें होता. त्याच्या राज्यांत पूर्ण समाधान नांदत असून गडबडगोंधळ, चोरीमारी, दंगाधोपा यांचें नांवहि नव्हतें. चोर व चोरी हे शब्द लोकांना नुसते ऐकून माहीत होते; प्रत्यक्ष चोरीचा अपराध कधींच कोणाच्या हातून घडत नसे.

दिलीप राजा बलवान् असून क्षमाशील होता; ज्ञानी असून विनय-शील होता व दानशूर असून स्तुतिप्रिय नव्हता. हे परस्परविरुद्ध गुण त्याच्या ठायीं सख्ख्या भावांसारखे गुण्यागोविंदानें नांदत असत. दिलीपाची ही गुणसंपदा सूर्यवंशाला सर्वतोपरी अनुरूप अशीच होती. कारण या वंशांतील राजे म्हणजे हातीं घेतलेलें काम यशःप्राप्तीपर्यंत चालविणारे, याचकांचे मनोरथ पूर्ण करणारे व सत्पात्रीं दान करण्याकरितांच द्रव्य-संग्रह करणारे होते. त्यांचा दिग्विजय कीर्तीसाठींच असे, धनलोभासाठीं नसे. मुखांतून असत्य वचन येऊं नये म्हणून ते मितभाषण करीत; अग्नीला यथाविधि आहुति देत; बाळपणीं ते चांगला विद्याभ्यास करीत; केवळ तरुणपणींच विषयोपभोग घेत; वृद्धपणीं वानप्रस्थ होत आणि योगधारणा करून अंतीं देह ठेवीत.

---

* सहस्रगुणमुत्स्रष्टुमादत्ते हि रसं रविः ।

दिलीपाचें हें भाषण ऐकून राजाला संतति कां नाहीं याचा विचार करण्यासाठीं वसिष्ठांनीं समाधि लावली व क्षणभरानें ते म्हणाले, " राजा, तुला पुत्रसंतान न होण्याचें कारण मला कळलें; पूर्वी एकदां इंद्राला साह्य करून तूं परत येत असतां, वाटेंत कल्पतरूच्या छायेला कामधेनु बसली होती; पण तूं स्वगृहीं जाण्यास फार उत्सुक झाला असल्यामुळें त्या पूज्य कामधेनूस प्रदक्षिणा घालण्यास विसरलास; त्यामुळें तिला राग आला व 'ज्याअर्थी तूं माझा असा अनादर केलास त्याअर्थी माझ्या संततीची सेवा केल्याशिवाय तुला संततीच होणार नाहीं' असा तिनें तुला शाप दिला. पण आकाशगंगेच्या प्रवाहाचा घो घो शब्द चालला असल्यामुळें तुला किंवा तुझ्या सारथ्यालाहि तो शाप ऐकूं आला नाहीं. तुला संतति न होण्याचें कारण हा शापच होय. कारण माननीयांचा अपमान केल्यानें कोणाचेंहि कल्याण होत नाहीं* हें लक्ष्यांत ठेव. राजा, या कारणास्तव संततीसाठीं त्या कामधेनूची आराधना करणें तुला प्राप्त आहे. पण सांप्रत ती पाताळलोकीं वरुणाच्या यज्ञाचें साहित्य पुरविण्यासाठीं गेली आहे, तथापि तिची कन्या नंदिनी माझ्या आश्रमांत आहे तिची सेवा करशील तर तीहि तुझे मनोरथ परिपूर्ण करण्यास समर्थ आहे. "

हें वसिष्ठांचें भाषण पुरें होतें न होतें तोंच चरावयास गेलेली नंदिनी वनांतून परत आली. तिचा वर्ण कोंवळ्या पानाप्रमाणें तांबूस व तुकतुकीत असून तिच्या कपाळावर शुभ्र केसांचा पुंजका चंद्रकलेप्रमाणें शोभत होता. तिचें वासरूं घरींच होतें; त्याला केव्हां पाजीन असें तिला होऊन गेल्यामुळें तिच्या कांसेंतून दुग्धधारा गळत होत्या. तिच्या खुरांनीं धूळ उडत होती. नंदिनी राजाच्या सन्निध आल्यावर ती धूळ त्याच्या अंगावर

* प्रतिबध्नाति हि श्रेयः पूज्यपूजाव्यतिक्रमः ।

उडाली तेव्हां तिच्यायोगें आपण पवित्र झालों असें राजास वाटलें. तें पाहून वसिष्ठ म्हणाले, " राजा, हा उत्तम शकुन झाला. आपण या मंगलधेनूचें नांव घ्यायला व ती येथें यायला एकच गांठ पडली म्हणावयाची. आतां तुझी इष्ट कामना लवकरच सिद्धीस जाणार यांत तिळमात्र संदेह नाहीं. उद्यांपासूनच तूं इची मनोभावें सेवा कर. इला वनांत चरावयास घेऊन जा. ती चालली कीं तिच्यामागून तूं चालावें, ती उभी राहिली कीं तूं उभें राहावें, ती बसली कीं तूं बसावें, ती पाणी प्याल्यावर तूं पाणी प्यावें. विद्यादेवी प्रसन्न ठेवण्यासाठीं जशी तिची नित्य सेवा करावी लागते, तद्वत् इची तूं निरलसपणें सेवा करावी. तुझ्या पत्नीनेंहि मोठ्या भक्तीनें इची परिचर्या केली पाहिजे. तिनें सकाळीं गाईला पोंचवायला जावें व सायंकाळीं सामोरें जावें. राजा, नंदिनीचा अनुग्रह होईपर्यंत तूं असा क्रम अखंड चालू ठेव. तुझें व्रत निर्विघ्नपणें पार पडो, व तुझ्यासारखाच सुपुत्र तुला होवो. "

---

# कथा दुसरी

## गोसेवा व सत्त्वपरीक्षा



कुलगुरूंच्या आज्ञेप्रमाणें त्या धर्मनिष्ठ व यशोधन राजानें व पतिव्रता सुदक्षिणेनें दुसऱ्याच दिवसापासून नंदिनीची सेवा करण्यास प्रारंभ केला. प्रात:काळीं उठून सुदक्षिणेनें तिची गंधाक्षतांनीं पूजा करून तिला पुष्प-माला घातली. वासरूं प्याल्यावर त्याला बांधून ठेवून दिलीपानें गाईला वनांत चरावयास जाण्यासाठीं सोडलें व आपण तिच्या मागोमाग चालला. सुदक्षिणाहि कांहीं अंतरापर्यंत त्यांना पोंचवावयाला गेली. मात्र आपल्या शरीररक्षकांपैकीं कोणासच त्यानें बरोबर येऊं दिलें नाहीं. कारण गाईचें किंवा स्वत:चें रक्षण करण्यास तो एकटाच समर्थ होता.

दिलीप गाईच्या पाठोपाठ सावलीप्रमाणें जाऊं लागला. तिला तो कोंवळ्या कोंवळ्या गवताचे गोड घास देई; तिचें अंग खाजवून तिच्या अंगावरील माशा वारी व ती पाणी प्याल्यावर मग आपण पाणी पिई. अशा प्रकारें तीं दोघें रानांत फिरत असतां, दोन्ही बाजूंचे वृक्ष पक्ष्यांच्या मुखांनीं राजाचा जयजयकार करूं लागले. तसेंच वाऱ्यानें मंदमंद डुलणाऱ्या लता त्या पूज्य राजावर फुलें उधळूं लागल्या. तेव्हां असें वाटलें कीं, जणूं नागरिकांच्या कन्या प्रयाणमंगलासाठीं त्याच्यावर लाह्या उधळीत आहेत. वेळूच्या रंध्रांतून वाहणाऱ्या वाऱ्यामुळें जो कर्णमधुर ध्वनि उत्पन्न होई, त्यामुळें वेणु-ध्वनीच्या तालांत वनदेवता राजाचें यशच गात आहेत कीं काय असें वाटे !

दिलीप धनुष्यबाण घेऊन फिरत असतांहि त्याचें अंत:करण दयाळू आहे असें हरिणींनीं ओळखिलें म्हणून त्यांनीं निर्भयपणें त्याच्याकडे

पाहून आपल्या विशाल नेत्रांचें पारणें फेडिलें. राजाच्या तेथील आगमनाचा असा परिणाम झाला कीं, सबळ प्राणी दुर्बलांना त्रास देतनासे झाले, पाऊस न पडतांहि वणवा विझूं लागला आणि वृक्षवेलींना फलपुष्पांचा नेहमींपेक्षां विशेष भर आला. राजाजवळ छत्र नव्हतें, तरीपण त्याला उन्हाचा मुळींच ताप झाला नाहीं. त्याला पंख्यासारखा वारा घालून वायु त्याचे श्रम दूर करूं लागला. याप्रमाणें दिलीपाच्या व नंदिनीच्या वनसंचारानें तो सर्व प्रदेश पवित्र होऊन गेला.

अशा रीतीनें दिवसभरचा कार्यक्रम झाल्यावर गाईला पुढें करून राजा आश्रमीं यावयास निघाला. आश्रमासमीप आल्यावर तो सुदक्षिणेच्या दृष्टीस पडतांच तिला अत्यंत आनंद झाला. तिच्या नेत्रांना सारा दिवस उपोषणच घडलें होतें. नंदिनी उटजद्वाराशीं येतांच तिनें तिला प्रदक्षिणा घातली व पूजासाहित्य घेऊन तिची पूजा केली. गाय वत्साला भेटण्यास समुत्सुक झाली होती; तथापि तिनें निश्चलपणें उभें राहून पूजेचा स्वीकार केला. नंदिनीसारख्या थोरांनीं भक्तजनांवर प्रसन्न होणें म्हणजे आगामी फलसिद्धीचें चिन्हच होय* हें जाणून त्या दंपत्याला नितान्त हर्ष झाला.

याप्रमाणें एकवीस दिवस दिलीपानें पत्नीसहवर्तमान हें गोसेवाव्रत एकनिष्ठेनें चालविलें.

बाविसाव्या दिवशीं आपल्या भक्ताची परीक्षा पाहावी असें नंदिनीच्या मनांत आलें. म्हणून वनांत गेल्यावर ती चरत चरत हिमालयाच्या एका गुहेंत शिरली. तेथें पलीकडील गंगेच्या धबधब्याचे तुषार येऊन कोवळें हिरवेंगार गवत वाढलें होतें, तें ती खाऊं लागली. राजाहि तिच्या मागो-

---

* प्रसादचिह्नानि पुरःफलानि ।

माग आला व तेथील अपूर्व शोभा पाहण्यांत दंग झाला. गाईला कोणी येऊन त्रास देईल अशी त्याला कल्पनाहि नव्हती; पण इतक्यांत गाईनें हंबरडा फोडला व त्यामुळें राजाचें लक्ष तिच्याकडे गेलें. पाहतो तों एक अक्राळविक्राळ सिंह तिच्यावर बसला आहे व ती दीनवाणीनें आपणाकडे पाहात आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. सिंहाची आयाळ पिंजारलेली असून डोळे इंगळासारखे लाल झालेले होते.

लगेच त्या सिंहाला ठार करण्यासाठीं या दीनवत्सल राजसिंहाचा हात बाण उपसण्याकरितां भात्याकडे गेला. पण काय चमत्कार ! त्याचा हात तेथून हलेचना ! त्यानें खूप धडपड केली, पण व्यर्थ ! चित्रांत काढल्याप्रमाणें तो स्तब्ध राहिला व मांत्रिकानें भारून टाकलेल्या सर्पाप्रमाणें हतबुद्ध होऊन आंतल्या आंतच आपल्या तेजानें जळफळूं लागला. इतक्यांत तो सिंहच मनुष्यासारखा बोलूं लागला. तो म्हणाला,

'राजा, पुरे झाले तुझे श्रम. व्यर्थ आयास कशास करतोस ? तूं माझ्यावर कोणतेंहि अस्त्र सोडलेंस तरी त्याचा कांहींएक उपयोग होणार नाहीं. वायु झाडें उन्मळून पाडतो, पण पर्वतावर त्याची मात्रा चालेल काय ?* कारण मी असातसा नव्हे. मी प्रत्यक्ष शंकराचा दास आहें. माझें नांव कुंभोदर. हा तुझ्यासमोर देवदारु वृक्ष पाहिलास का ? भगवान् महादेवाचा हा इतका आवडता आहे कीं, ते त्याला आपला पुत्रच मानतात. पार्वतीनेंहि याला स्वतः हातानें पाणी घालून वाढविलें आहे. एकदां असें झालें कीं, एका वनगजानें आपलें गंडस्थळ याच्या बुंध्यावर घासलें; त्यामुळें याची साल निघाली. ती पाहून जणूं काय कार्तिकेयाच्याच शरीरावर आघात झाला आहे असें वाटून पार्वतीला

---

* न पादपोन्मूलनशक्ति रंहः शिलोच्चये मूर्च्छति मारुतस्य ।




राजा दिलीप गाईचें रक्षण करण्यासाठीं सिंहावर बाण सोडूं पाहात आहे. (पृ. ८)

फार दुःख झालें. तेव्हांपासून वनगजाचा उपद्रव याला होऊं नये म्हणून महादेवानें मला सिंहाचें रूप दिलें व येथें येणाऱ्या प्राण्यांना मीं खावें असें ठरवून या वृक्षाच्या रक्षणार्थ माझी योजना केली. मला फार दिवस भक्ष्य मिळालें नाहीं. आज माझ्या सुदैवानें ही गाय मला सांपडली आहे. हिचें रक्त प्राशन करून मी पारणें सोडणार. तूं आतां निःशंकपणें परत जा कसा. आजवर गोसेवा करून तूं आपली गुरुभक्ति प्रकट केली आहेस. तेव्हां तुला लज्जा बाळगण्याचें कारण नाहीं; कारण एकाद्या वस्तूचें रक्षण शस्त्रानें करणें अशक्य असेल तर तेवढ्यानें शस्त्रधारण करणाऱ्याच्या यशाला बाध येतो अशांतला भाग नाहीं."

अशा प्रकारचें सिंहाचें गंभीर भाषण ऐकून दिलीपाला कळून चुकलें कीं, शिवप्रभावानेंच आपलीं शस्त्रास्त्रें आज कुंठित झालीं आहेत. तेव्हां आपण आपलें कर्तव्य न केल्याबद्दल त्याला जो खेद वाटत होता तो नाहींसा झाला. मग तो सिंहास म्हणतो—

"हे मृगेंद्रा, तूं शंकराचा सेवक असल्यामुळें सर्वज्ञ आहेस. अर्थात् माझ्या मनांतील भाव तुला कळतोच आहे. तरीदेखील मी दोन शब्द बोलतों.

सर्व जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करणारा महेश्वर जसा मला वंदनीय आहे तसें गुरूचें गोधनदेखील रक्षणीय आहे. डोळ्यांदेखत त्याची मी उपेक्षा कशी करूं ? म्हणून म्हणतों कीं, माझा देह भक्षण करून आपली क्षुधा शांत कर आणि महर्षीची गाय सोडून दे."

यावर किंचित् स्मित करून सिंह म्हणाला, "राजा, तूं वेडा तर नाहींस ? सर्व पृथ्वीचें एकछत्री साम्राज्य, भर तारुण्य, सोन्यासारखा सुंदर देह इतकें सारें घालवून तूं एकट्या गाईला मात्र वांचविणार कीं काय ?

बरें, ह्या गाईचा जीव वांचविल्यानें भूतदया होते म्हणावें, तर तसेंहि नाहीं; कारण तूं हिजसाठीं आपल्या प्राणाची आहुति दिलीस तर एकटी गाय मात्र वांचेल, पण तुझी प्रजा उघडी पडेल. आणि तूं जिवंत राहिल्यास तुझ्या लक्षावधि प्रजेचें रक्षण होईल. आतां आपल्या गुरूची एकच गाय आहे व ते रागीट आहेत म्हणून तूं भीत असशील तर त्या भीतीचेंहि कारण नाहीं. घडाभर दूध देणाऱ्या असल्या कोट्यवधि गाई देऊन तुला त्यांचा कोप शांत करतां येणार नाहीं काय ?

" राजा, तुझें राज्य म्हणजे इंद्रपदच आहे; हें पृथ्वीतलावर व तें स्वर्ग लोकांत एवढेंच. तुला स्वर्गसुख तर येथेंच मिळत आहे. तेव्हां सर्वसुखोपभोगाचें साधन जें तुझें तेजस्वी शरीर त्याचें विनाकारण बलिदान कां करतोस ? "

इतकें बोलून सिंह स्तब्ध राहिला. त्याच्या भाषणाचा प्रतिध्वनि उमटला आणि त्यामुळें हिमालयपर्वतहि त्याला अनुमोदन देत आहे असें वाटलें.

हें दोघांचें संभाषण चाललें असतां नंदिनी दीनपणें राजाकडे पाहात होती. तिला बघून दिलीपाचें अंतःकरण अधिकच कळवळलें व तो पुनः म्हणाला—

" मृगेंद्रा, जीवांची पीडा नाहींशी करून त्यांचें रक्षण करणें हाच क्षत्रियांचा खरा धर्म. याच्या उलट वर्तन करून आश्रितांची उपेक्षा करून स्वतःचे प्राण वांचविले तर तें माझ्या क्षत्रिय कुलाला शोभेल काय ? सर्वांनीं छीथू केल्यावर माझ्या राज्याचा तरी मला काय उपयोग ? आणि मग जगून तरी काय करावयाचें ? क्षत्रिय शब्दाचा अर्थच 'क्षतापासून रक्षण करणारा' असा आहे.* आतां, दुसऱ्या अनेक गाई देऊन या

* क्षतात्किल त्रायत इत्युदग्रः क्षत्रस्य शब्दो भुवनेषु रूढः ।

पण पाहतो तों ती उडी न पडतां विद्याधरांच्या हातचीं फुलेंच आपणावर पडलीं व त्याच क्षणीं 'वत्सा, ऊठ' असा अमृततुल्य मधुरध्वनि त्याच्या कानावर पडला.

त्यासरसा दिलीप वर उठून अवलोकन करतो तों सिंह नाहींसा झाला असून आईप्रमाणें प्रसन्नवदन अशी नंदिनी मात्र त्याला दिसली! तिला एकटीला पाहून दिलीप अगदीं चकित झाला. तेव्हां नंदिनी त्याला म्हणाली—

"वत्सा, स्वस्थ हो. माझ्या ठायीं तुझी निष्ठा किती आहे हें कसाला लावून पाहण्यासाठींच मी ही माया निर्माण केली होती. एरव्हीं महर्षींच्या तपःसामर्थ्यामुळें मजकडे वक्रदृष्टीनें पाहण्याची प्रत्यक्ष काळाचीसुद्धां छाती नाहीं, मग इतर हिंस्त्र प्राण्यांची काय कथा! तुझी गुरुभक्ति व मजविषयींची तुझी अनुकंपा पाहून मी तुजवर संतुष्ट झाल्यें आहें; तुला इष्ट असेल तो वर माग. मी केवळ दूध देणारी गाय नसून तुजवर प्रसन्न झालेली साक्षात् कामधेनु आहें हें लक्षांत ठेव."

हें ऐकून दिलीपाचा आनंद गगनांत मावेना. तो स्वतः याचकांचे मनोरथ पूर्ण करणारा असतांहि नंदिनीपुढें हात जोडून म्हणाला, माते, सुदक्षिणेला अपार कीर्तिमान् असा कुलदीपक पुत्र व्हावा एवढेंच माझें मागणें आहे.

नंदिनीनें 'तथास्तु' असें म्हटलें आणि 'पानांच्या द्रोणांत माझें दूध काढून तें प्राशन कर' असें त्याला सांगितलें. तेव्हां दिलीप म्हणाला, 'हे माते, तुझें वासरूं पिऊन झाल्यावर व होमाकरितां लागणारें दूध काढून ठेवल्यावर जें अवशिष्ट राहील तेवढें मी ऋषींची आज्ञा घेऊन प्राशन करीन. माझा अधिकार षष्ठांशावरच आहे, अधिकावर नाहीं.'

हें ऐकून तर नंदिनीस परम संतोष झाला व तेथून राजा व ती आश्रमीं परत आली.

आश्रमास आल्यावर दिलीपाच्या मुखावरील प्रसन्नतेमुळें नंदिनीचा कृपाप्रसाद त्याच्यावर झाला आहे हें सहज दिसून येत होतें. तथापि ती गोष्ट प्रथम त्यानें आपल्या गुरुजीस व मग आपल्या पत्नीला सांगितली.

नंतर पूर्वीं ठरल्याप्रमाणें वत्साला पाजून व अग्नीला आहुति देऊन उरलेलें दूध—जणूं मूर्तिमंत शुभ्र यशच—राजानें वसिष्टाची आज्ञा घेऊन मोठ्या उत्कंठेनें प्राशन केलें.

याप्रमाणें दिलीपाचें व्रत यथासांग पार पडलें. मग वसिष्टानें त्या दंपतीला मंगल आशीर्वाद दिला आणि त्यांची स्वगृहीं पाठवणी केली.

---

# कथा तिसरी

## रघूचा जन्म, बाल्य व शिक्षण



आपला राजा कृतार्थ होऊन राजधानीस परत आला हें पाहून प्रजाजनांस हर्ष झाला व त्यांनीं गुढ्यातोरणें उभारून त्याचें अभिनंदन केलें.

पुढें कांहीं दिवस लोटल्यावर सुदक्षिणा गर्भवती झाली व तिला हळूहळू गर्भिणीचीं सर्व लक्षणें दिसूं लागलीं. तिचें शरीर कृश झालें व मुखावर थोडी पांडुरता दिसूं लागली. तिला अंगावर फारसे अलंकारहि वालवतना! आपला पुत्र संपूर्ण पृथ्वीचा उपभोग घेणारा होणार याची पूर्वसूचना म्हणूनच कीं काय तिला मृत्तिकाभक्षणाची इच्छा होऊं लागली. मग हीं सर्व चिन्हें पाहून राजाहि तिची वारंवार चौकशी करी. लाजेमुळें तिनें कांहीं न सांगितल्यास तिच्या मैत्रीणींकडून तिला काय हवें नको तें तो विचारून घेऊं लागला. त्याला त्रैलोक्यामध्यें कोणत्याहि गोष्टीची उणीव नव्हती; अर्थात् राणीलाहि मनांत येईल ती वस्तू तत्काळ मिळत असे.

याप्रमाणें डोहाळ्यांचा काळ गेल्यावर तिचें शरीर थोडें पुष्ट झालें व ती नवीन पालवी फुटलेल्या लतेप्रमाणें शोभूं लागली. पुढें दहावा महिना लागल्यावर सुदक्षिणा प्रसूत होऊन तिला पुत्ररत्न झालें. त्यावेळीं पांच ग्रह उच्चीचे असून अस्तंगत नव्हते; दशदिशा सुप्रसन्न झाल्या; सुखकर वारे वाहूं लागले व दुसरेहि अनेक शुभशकून घडून आले. त्यावरून हा मुलगा अत्यंत भाग्यशाली होणार असें दिसून आलें. त्याच्या तेजापुढें सूतिकागृहांतील मध्यरात्रीचे दीप फिके पडले व ते जणूं चित्रांत काढलेल्या दिव्यांप्रमाणें दिसूं लागले.

ही पुत्रजन्माची अमृतमय सुवार्ता अंत:पुरांतील सेवकाच्या मुखानें राजाच्या कानावर गेली. तेव्हां तो हर्षपुलकित होऊन त्या वार्ताहराला काय देऊं व काय न देऊं असें त्याला होऊन गेलें. लगेच तो प्रसूतिगृहांत गेला आणि पुत्राचें सुंदर मुख निश्चल नेत्रांनीं त्यानें अवलोकन केलें तेव्हां चंद्रोदयाबरोबर महासागराला येणाऱ्या भरतीप्रमाणें राजाला प्रेमाचें अनिवार भरतें आलें.

मग त्यानें वसिष्ठाला तपोवनांतून आणविलें आणि मुलाचे संपूर्ण जात-संस्कार करविले. तेव्हां तो बालक खाणीमधून काढून पैलू पाडलेल्या रत्नाप्रमाणें विशेषच शोभूं लागला. या मंगलप्रसंगीं तूर्यादि मंगलवाद्यांचे ध्वनि दिलीपाच्या वाड्यांतच काय पण देवलोकांतदेखील दुमदुमून राहिले.

पुत्रजन्माच्या हर्षानें कारागृहांतून मुक्त करावयाला दिलीपाच्या कारागृहांत कोणी बंदिजनच नव्हता; पण हें न्यून त्यानें स्वत: पितरांच्या ऋणबंधनांतून स्वत:स मुक्त करून भरून काढलें. बारशाच्या दिवशीं राजानें आपल्या पुत्राचें नांव **रघु** असें ठेविलें. 'रघु' असें नांव ठेवण्यांत त्याचा कांहीं हेतु होता. 'रघ्' म्हणजे त्वरेनें जाणें. हा मुलगा वेदशास्त्रपारंगत होणार व युद्धामध्यें शत्रूंवर विजय मिळविणार असा अभिप्राय 'रघु' हें नांव ठेवण्यांत राजाच्या मनांत होता.

दिवसानुदिवस रघु बालचंद्राप्रमाणें वाढूं लागला. तेव्हां इंद्राच्या जयंताप्रमाणें किंवा शंकराच्या कार्तिकेयाप्रमाणें त्याची छबी दिसूं लागली. जयंत—कार्तिकेयांसारखा आपला पुत्र पाहून राजाला व राणीला परमानंद होऊं लागला. सुदक्षिणा व दिलीप यांचें परस्पर प्रेम चक्रवाकांच्या जोडप्यांमधील प्रेमाप्रमाणें उत्कट होतें. हें प्रेम मुलामध्यें वांटलें गेलें असतांहि कमी न होतां वृद्धिंगतच होत गेलें.

हळूहळू रघुबाळ बोलूं चालूं लागला. दाईनें शब्द शिकवावे व त्यानें म्हणावे; दाईनें हात धरावा व त्यानें चार पावलें टाकावीं; तिनें वडि-

लांना नमस्कार करावयाला सांगावा व त्यानें हात जोडावे. ह्या त्याच्या लीला पाहून पित्याला आल्हाद होई. तो त्याला मांडीवर घेई तेव्हां अंगावर अमृतवर्षाव झाल्याप्रमाणें त्याला सुख होई.

योग्यकाळीं रघूचा चौल संस्कार झाला. तेव्हां तो अमात्याच्या समवयस्क मुलांबरोबर खेळावयास जाऊं लागला. तसेंच त्यांच्यासह त्याला अक्षरओळख करून देण्यांत आल्यावर त्यानें क्रमाक्रमानें वाङ्मयसमुद्रांत प्रवेश केला. नंतर यथाविधि त्याचें उपनयन झाल्यावर विद्वान् अशा गुरूंनीं त्याला निरनिराळ्या विषयांचें शिक्षण दिलें. आपले परिश्रम फलद्रूप झाल्याचें पाहून गुरूंना मोठी कृतकृत्यता वाटली. सत्पात्र मनुष्याच्या ठिकाणीं केलेले प्रयत्न सफल होणारच.* रघूनें आपल्या तीव्र बुद्धीच्या प्रभावानें सागराप्रमाणें विस्तीर्ण अशा चारी विद्यांचें अध्ययन केलें. अस्त्रविद्या मात्र तो आपल्या पित्यापाशीं शिकला; कारण दिलीप जसा पृथ्वीचा एकछत्री राजा होता तसाच धनुर्विद्येमध्येंहि अद्वितीय होता.

क्रमाक्रमानें बाल्य संपून रघूस यौवनदशा प्राप्त झाली. हत्तीचा छावा तारुण्यावस्थेंत प्रवेश करितांना जसा डौलदार दिसतो तसा रघूहि दिसूं लागला. धिप्पाड शरिरामुळें पित्याहून तो वरचढ झाला होता, तरी पण नम्रपणा मात्र त्यानें किमपिहि सोडला नाहीं. तो आपली पायरी ओळखूनच वागे.

असा त्याचा एकंदर विकास झालेला पाहून दिलीपानें त्याचा विवाह करून दिला आणि प्रजापालनाचा आपला भार हलका करण्यास्तव त्याची यौवराज्यावर स्थापना केली. त्यामुळें वायूच्या साहाय्यानें अग्नि जसा असह्य होतो तसा रघूच्या साह्यानें दिलीप सर्वथैव अजिंक्य झाला.

---

* क्रिया हि वस्तूपहिता प्रसीदति ।

# कथा चवथी

## रघूचें इंद्राशीं युद्ध



अशा रीतीनें आपलें बल वृद्धिंगत झालेलें पाहून दिलीपाच्या मनांत अश्वमेध करावा असें आलें. तदनुसार त्यानें यज्ञीय अश्वाच्या रक्षणासाठीं धनुर्धारी रघूची योजना करून नव्याण्णव यज्ञ निर्विघ्नपणें पार पाडले.

त्यानंतर त्यानें शंभराव्या यज्ञास विधिपूर्वक प्रारंभ केला आणि पूर्ववत् समागमें रक्षक देऊन अश्व सोडला. पण यावेळीं मात्र एक विघ्न उपस्थित झालें. इंद्रानें गुप्तपणें तो घोडा पळविला; हें पाहून रघूचें सैन्य गांगरून गेलें आणि आतां काय करावें हें त्यास सुचेना. इतक्यांत वसिष्ठाची कामधेनु नंदिनी फिरत फिरत येतांना त्याच्या दृष्टीस पडली. रघूनें तिला वंदन करून तिचें पवित्र गोमूत्र डोळ्यांला लावलें. तेव्हां काय चमत्कार झाला ? त्यास दिव्यदृष्टि प्राप्त झाली आणि पूर्वदिशेच्या बाजूस कोणी रथाच्या दोऱ्यांनीं बांधून अश्व नेत आहे असें त्यास आढळलें. घोडा चोरून नेणाऱ्याच्या पापण्या हलत नव्हत्या आणि त्याच्या रथाचे घोडे उदी वर्णाचे होते. यावरून तो इंद्रच होय असें रघूनें ओळखिलें व त्याला परत फिरण्यासाठीं तो आकाशभेदी स्वरानें हाका मारूं लागला. तो म्हणाला,

" हे देवेन्द्रा, आम्ही यज्ञ करतों तो तुम्हां देवासाठींच. त्यांतील हविर्भाग प्रथम तुला मिळावयाचा असें असतां, या माझ्या पित्याच्या यज्ञांत विघ्न करावयाला तूंच प्रवृत्त होतोस याला काय म्हणावें ? यज्ञयागांत कोणी व्यत्यय आणील तर त्याचें पारिपत्य करणें हेंच तुझें कर्तव्य; तें न करितां उलट तूंच विघ्न उपस्थित करूं लागलास तर कर्माचा लोपच

झाला म्हणावयाचा ! तरी आतां अश्व सोडून दे. सन्मार्ग दाखविणारे थोर लोक असल्या दूषित मार्गाचा आश्रय करीत नाहींत."*

हें रघूचें प्रगल्भ भाषण ऐकून स्वर्गाधिपति इंद्रानें आपला रथ माघारा फिरविला आणि आश्चर्यचकित होऊन तो त्याला उत्तर देऊं लागला. तो म्हणाला—

"हे राजपुत्रा, तूं म्हणतोस तें सत्य आहे. परंतु कीर्तीची ज्यांना चाड आहे, त्यांनीं तिचें रक्षण करावयास नको काय ? असें पाहा कीं, शंभरावा यज्ञ करून ती माझी कीर्तिच हिरावून घेण्यास तुझा पिता उद्युक्त झाला आहे. इंद्र ही पदवी माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाला लाविलेली मला खपणार नाहीं. 'पुरुषोत्तम' म्हटलें कीं, विष्णूचाच बोध झाला पाहिजे आणि 'त्र्यंबक' शब्दानें 'महेश्वरच' डोळ्यांपुढें उभा राहातो. तशी 'शतक्रतु' ही पदवी माझी एकट्याचीच होय. तुमच्या यज्ञपूर्तीनें या माझ्या पदवीला बट्टा लागणार आहे. म्हणून तर मी हा अश्व हरण करून पाताळांत नेऊन ठेविला आहे. तो परत मिळविण्याचा तुझा प्रयत्न फुकट आहे. सगराच्या पुत्रांप्रमाणें व्यर्थ खड्ड्यांत कां पडतोस ?"

इंद्राच्या या उत्तरानें रघूच्या मनाला भयाचा स्पर्शहि झाला नाहीं. तो हंसून म्हणाला,

"घोडा सोडावयाचा नाहीं असा तुझा निश्चयच असेल, तर शस्त्र घेऊन युद्धास सिद्ध हो. रघूला जिंकल्याखेरीज तुझ्या नांवाची सार्थकता नाहीं" असें म्हणून रघूनें धनुष्यास हात घातला आणि बाण सोडण्याकरितां तो पवित्र्यांत उभा राहिला. लगेच एक बाण धनुष्यावर जोडून

---

* पथः श्रुतेर्दर्शयितार ईश्वरा मलीमसामाददते न पद्धतिम् ।

त्यानें तो इंद्राच्या छातीवर अचूक सोडला. बाण लागतांच इंद्र क्रोधायमान झाला आणि त्यानेंहि उलट आपल्या धनुष्यावर बाण चढवून रघूवर सोडला. वस्तुतः इंद्राचा बाण विक्राळ राक्षसांचें रक्त पिणारा! पण यावेळीं कुतूहलानेंच कीं काय, रघूच्या वक्षःस्थळांत प्रवेश करून त्यानें मनुष्याच्या रक्ताचा आस्वाद घेतला!

अशा रीतीनें इंद्र व रघु यांमध्यें तुमुल द्वंद्वयुद्ध चालू झालें. रघु भूमीवर व इंद्र आकाशांत असल्यामुळें एकाचे बाण खालून वरती व दुसऱ्याचे वरून खालीं येत होते. रघूनें इंद्रावर निरनिराळ्या अस्त्रांचा असा कांहीं मारा केला कीं, इंद्राला तो निवारितां येईना. कारण रघु झाला तरी इंद्राचाच अंश होता. त्यानें एका अर्धचंद्राकृति बाणानें इंद्राच्या धनुष्याची दोरीच छाटून टाकिली. तेव्हां मात्र इंद्राला फारच राग चढला आणि प्रतिस्पर्ध्याचा नाश करण्यासाठीं त्यानें आपलें तेजस्वी वज्र उगारून रघूच्या वक्षःस्थळावर त्याचा तीव्र प्रहार केला. रघूला हा वज्राघात सहन झाला नाहीं. तो धाडकन् भूमीवर पडला. त्याला पाहून त्याच्या सैनिकांनीं टप्टप् अश्रु गाळिले; पण थोड्याच वेळांत त्याची मूर्च्छा जाऊन तो उठला व तत्क्षणींच सैनिकांनींहि आनंदानें आरोळ्या मारल्या.

रघु जरी इंद्राचा शत्रु झाला होता तरी त्याचें युद्धकौशल्य पाहून इंद्राला परम संतोष झाला. सर्वांनांच गुण प्रिय होतात.* इंद्र मग रघूला म्हणाला, "तुजवांचून कोणींहि आजवर वज्राचा प्रहार सहन केला नाहीं. शाबास! तुझ्या पराक्रमानें मी संतुष्ट झालों आहें. तर तूं आतां वाटेल तें माग. मी तें देतों, पण घोडा मात्र मागूं नको."

* पदं हि गुणैर्निधीयते सर्वत्र।

इंद्राचें हें मधुर भाषण ऐकून रघूनें भात्यांतून अर्धवट बाहेर काढलेला बाण पुनः भात्यांत ठेवला व म्हटलें, ‘ हे इंद्रा, अश्व सोडून देणें तुला योग्य वाटत नसेल तर निदान आमचा यज्ञविधि पूर्ण झाल्यावर त्याचें संपूर्ण फळ मिळेल व हा सर्व वृत्तांत तुझ्या दूताकरवीं माझ्या पित्याच्या कानीं पडेल असें तरी कर. ’

‘ ठीक आहे ’ असें म्हणून तसें करण्याचें अभिवचन दिल्यावर इंद्र आपल्या लोकीं निघून गेला आणि रघूहि थोडासा खिन्न होऊन यज्ञ-मंडपाकडे परतला.

इकडे इंद्रानें वचन दिल्याप्रमाणें दिलीपाला सर्व वृत्त कळविलेंच होतें; म्हणून रघु आलेला पाहतांच त्याचें त्यानें अभिनंदन केलें आणि वज्रप्रहारानें पीडित झालेल्या त्याच्या अंगावरून प्रेमानें हात फिरविला.

याप्रमाणें दिलीपानें नव्याण्णव यज्ञ पूर्ण करून स्वर्गास जाण्याची सोपानपरंपरा सिद्ध करून ठेवली. मग यथाकाळीं त्यानें रघूवर सर्व राज्यकारभार सोंपविला आणि सुदक्षिणेसहवर्तमान तपोवनाचा आश्रय केला; कारण वृद्धावस्थेस पोंचलेल्या इक्ष्वाकुवंशीय राजांचें हें परंपरागत कुलव्रतच होतें.

खुलून दिसूं लागला ! अगस्तीचा उदय झाला, त्याबरोबर उदकें शांत व प्रसन्न झालीं; पण रघूचा उत्कर्ष पाहून त्याच्या धाकानें शत्रूचीं मनें मात्र क्षुब्ध व कलुषित झालीं !

शरदृतूच्या आगमनानें नद्यांचें पाणी उथळ झालें; रस्त्यांतील चिखल वाळून गेला; असें पाहून शरत्काल दिग्विजयास निघण्यासाठीं आपणांस प्रोत्साहन देत आहे असें रघूला वाटलें. लगेच त्यानें सर्व सिद्धता केली व अग्नीला आहुति दिली. त्या वेळीं अग्नीनेंहि आपल्या ज्वाळा उजव्या बाजूला पसरून त्याला विजयप्राप्तीचा आशीर्वाद दिला. मग तो चतुरंगसैन्य, मंत्री व मित्रराजे यांना समागमें घेऊन दिग्विजयाला निघाला. त्या वेळीं त्याच्यावर वृद्ध पौरस्त्रियांनीं लाह्या उधळून त्याचा जयजयकार केला.

प्रथम रघूनें पूर्व दिशा धरली. त्याचें सैन्य चालूं लागलें तेव्हां भूमि व आकाश यांची जणूं उलटापालट झाली आहे असें वाटलें; कारण रथांमुळें आकाश धूलिमय झालें व हस्तिसैन्यामुळें पृथ्वी मेघांनीं व्याप्त झाल्यासारखी दिसूं लागली.

त्याच्या सैन्याचा जेथें जेथें तळ पडे तेथें तेथें ओसाड भूमिप्रदेश पाण्यानें भरून जात, खोल नद्या उथळ होत व निबिड अरण्यें प्रकाशमय होऊन जात. तो आपली मोठी सेना बरोबर घेऊन पूर्वसागराकडे जात असतां शिवाच्या जटेंतून पडलेल्या गंगेस नेणाऱ्या भगीरथाप्रमाणें दिसत होता. हत्ती चालूं लागला असतां मार्गांतील कांहीं झाडें उपटून टाकितो, कांहीं मोडून टाकितो व कांहींचीं फळें खातो, तद्वत् रघु राजा कांहीं राजांना पदच्युत करी, कांहींना पराभूत करी व कित्येकांपासून करभार घेई.

ह्याप्रमाणें पूर्वेकडील देश पादाक्रांत करीत व राजांची व्यवस्था लावीत रघु महासागराच्या तीरावर येऊन ठेपला. तो सर्व प्रदेश

ताडवृक्षांच्या अरण्यानें श्याम झालेला होता. ' महापुरें झाडें जाती तेथें लव्हाळे वांचती ' या न्यायानें ब्रह्मी लोकांनीं रघूपुढें नम्र होऊन आपलें संरक्षण करून घेतलें. वंग देशाचे राजे आपणांस बलाढ्य समजत होते; कारण त्यांचें नाविकबल श्रेष्ठप्रतीचें होतें. पण रघूनें त्यांना रसातळास पोंचविलें; तथापि ते दांतीं तृण धरून शरण आल्यानें त्यांची त्यानें पुनरपि स्वस्थानीं स्थापना केली व गंगेच्या प्रवाहांतील द्वीपांमध्यें विजयस्तंभ उभारले.

त्यानंतर वाटेंत रघूनें उत्कल ( ओढ्या ) च्या राजाला वश केलें आणि त्याच्या सूचनेवरून तो कलिंगदेश सर करावयास निघाला. तेथें जाण्यासाठीं कपिशा नदी ओलांडावी लागते. ती त्यानें हत्तींचा पूल करून ओलांडली. नदीपार गेल्यावर कलिंगदेशाचा राजा गजसैन्याच्या साह्यानें त्याशीं लढावयास सिद्ध झाला व अस्त्रांचा वर्षाव करूनच त्यानें रघूचें स्वागत केलें. रघूनें तो मारा सहन करून व त्याच्याशीं दोन हात करून त्याला चतुर्भुज केलें. परंतु त्याचा नक्षा उतरल्यावर रघूनें त्याचें राज्य त्यास परत देऊन त्याजपासून करभार मात्र घेतला.

तदनंतर रघु दक्षिणेकडे वळला आणि समुद्रकांठानें पोफळींच्या आगरांतून जात जात अखेरीस चंदनवृक्षांचें आगरच अशा मलय पर्वताच्या आसमंतात् त्यानें तळ दिला. त्याची सेना इतकी अवाढव्य होती कीं, तीमुळें कोसच्या कोस प्रदेश व्यापला जाई. तेथें वेलदोड्यांचे वेल घोड्यांच्या खुरांनीं तुडविले गेल्यामुळें वेलचीच्या दाण्यांचे कण हवेंत उडून, आपल्यासारख्याच सुगंधि असलेल्या हत्तींच्या मदस्रावी गंडस्थलांवर चिकटून बसत. सूर्य दक्षिण दिशेकडे असतां त्याचें तेज मंद असतें, पण रघूचें तेज मात्र वृद्धिंगत होऊन पांड्य राजांना तें सहन करितां आलें नाहीं. यांनीं रघूपुढें विनम्र होऊन ताम्रपर्णी नदीजवळील सागरांतून काढलेलीं

पाणीदार व टपोरीं मोत्यें रघूला समर्पण केलीं व त्याबरोबर फारा दिवसांचें संचित केलेलें आपलें यशच जणूं त्यास देऊन टाकलें !

पुढें चंदनवनयुक्त अशा मलय व दर्दुर पर्वतांवर यथेच्छ विहार करून रघु राजा समुद्रापासून दूर असलेल्या सह्याद्रीच्या पायथ्याशीं येऊन पोंचला. तेथून सह्यपर्वत ओलांडून तो कोंकणांत उतरला. त्याचा सेनासमुद्र पश्चिम-समुद्रापावेतों सारखा पसरल्यामुळें खरा समुद्र जरी परशुरामाच्या अस्त्रांनीं सह्याद्रीपासून दूर हटविला होता, तरी या वेळीं तो त्या पर्वताला जसा कांहीं चिकटलेला आहे असें वाटलें.

तेथून रघु केरळ देश ओलांडून व कोंकणपट्टींतील राजांपासून कर घेऊन पारसीक देश जिंकण्यासाठीं स्थलमार्गानें निघाला. पारसिकच्या राजापाशीं उत्कृष्ट प्रकारची अश्वसेना विपुल होती. पारसिकास पोंचल्यावर तेथील राजाशीं रघूचें घनघोर युद्ध झालें; त्यांत रघूच्या सैनिकांनीं पारसिकांची दाणादाण उडवून दिली व आपल्या भाल्यांनीं लांब लांब दाढ्यांचीं यवनशिरें छाटून रणभूमि आच्छादून टाकली. मधाच्या पोळ्यांवर भ्रमर येऊन बसावे असा तो देखावा दिसूं लागला. या धुमश्चक्रींतून जे थोडे-बहुत जिवंत राहिले ते मुठींत नाक धरून व शिरस्त्राणें काढून रघूला शरण आले. थोरांच्या क्रोधाचा प्रतिकार त्यांच्यापुढें शिर नमविण्यानेंच होतो.*

पारसीक देशाहून रघु उत्तर दिशेला वळून काश्मीर प्रांतीं आला. तेथें राज्य करीत असलेल्या हूणांचा त्यानें धुव्वा उडविला. सिंधु नदाच्या तीरावर त्याच्या सैन्यानें विसांवा घेऊन केशराच्या ताज्या फुलांचाहि आस्वाद घेतला. घोड्यांचीं सर्वांगें केशरतंतूंनीं भरून गेलीं. पुढें कांबोज-

* प्रणिपातप्रतीकारः संरम्भो हि महात्मनाम् ।



निषधपर्वत
चीनदेश
पारसीक
पुष्कलावति
तक्षशिला
सिन्धु
ऐरावती
विपाशा
सरस्वती
शतद्रु
नैमिशारण्य
पारियात्र
आर्यावर्त
कोम्भोजा:
हिमालय
कैलास
वृन्दावन
मथुरा
कालिन्दी
अयोध्या
श्रावस्ति
उत्तरकोसल
प्रयाग
गङ्गा
कुसुमपुर
चम्पा
प्रागज्योतिष
कामरूप
अङ्ग
त्रिकूट
विदिशा
चित्रकूट
उज्जैनी
विन्ध्यपर्वत
नर्मदा
माहिष्मती
कुशावती
हैहय
महेन्द्रशैल
विदर्भ

देशाच्या राजांनाहि रघूपुढें टिकाव धरवला नाहीं. त्यांनीं रघूचें आधिपत्य मान्य करून त्याला पुष्कळ चांगले चांगले घोडे व द्रव्यराशी अर्पण केल्या. रघूनें निरभिमानानें त्यांचा स्वीकार केला.

मग या वाजिदलाच्या साह्यानें रघु हिमालयाचा प्रदेश चढूं लागला. वाटेंत शैलराजाच्या गुहांतून मधून मधून मृगराज त्याच्या दृष्टीस पडत. तसेंच वेळूंच्या वनांतून वाहणाऱ्या वायूचा मधुर ध्वनि आणि भागीरथीच्या धबधब्यानें उडणारे शीतल तुषार, त्याचा शीण हलका करूं लागले. नमेरु वृक्षांखालील शिलातलांवर कस्तूरीमृग बसत असल्यामुळें ते सुगंधित झालेले होते. तेथेंच रघूच्या सैन्यानें विश्रांति घेतली. रात्रीच्या वेळेस त्यांना नित्याच्या तैलप्रदीपांची अवश्यकताच भासली नाहीं; कारण त्यांच्या जवळपास शेंकडों ज्योतिर्लता स्फुरण पावत होत्या.

पुढें गेल्यावर किरात व उत्सवसंकेतादि पर्वतीय गणांना पराभूत करून त्यांना मिळणाऱ्या निरनिराळ्या प्रकारच्या हिमालयीन वस्तू करभार म्हणून त्यांच्यापासून त्यानें घेतल्या. यायोगें नरपतीला नगाधिराजाचें सार कळून आलें आणि नगाधिराजालाहि नरपतीचें बल अवगत होऊन परस्परांच्या विनिमयानें परस्परांचा परिचय झाला. कैलास पर्वत तेथून जवळच होता. तथापि तिकडे जाण्याचा बेत रघूनें रहित केला. रावणानें पूर्वी हें उच्च शिखर गदगदा हलविलें होतें. तेव्हां त्यावर पुनः आक्रमण कशाला करा असा विचार मनांत आणून व तेथें जयस्तंभाच्या रूपानें आपला यशोराशि ठेवून तो परत फिरला. त्याचें धवल यशोधन पाहून धवलगिरीलाहि लज्जा उत्पन्न झाली असेल !

मग लौहित्यनदीच्या पार जाऊन रघूनें पलीकडील प्रांतांत प्रवेश केला. तेथील कामरूपाच्या ( आसाम ) राजांनीं त्याचें वर्चस्व मान्य करून

त्याला अनेक उत्तमोत्तम हत्तींचा नजराणा दिला. कामरूपांतील राजे आपल्या मतंगजांच्या जोरावर इतर नृपालांना भारी झाले होते; परंतु रत्नपुष्पें समर्पून त्यांनाहि रघूचे पाय धरावे लागले.

ह्याप्रमाणें सर्व दिशा जिंकून विजयी रघु राजधानीस परत आला व विश्वजित् ( विश्व जिंकल्यावर जो यज्ञ करतात तो ) नांवाचा यज्ञ त्यानें केला. त्यांत त्यानें सर्व द्रव्याचें दान केलें. मेघ हे पाऊस पाडण्यासाठींच जलाशयांचें पाणी शोषून घेतात; सज्जन लोकहि संपत्ति मिळवितात ती सत्कार्यीं व्यय करण्यासाठींच होय.*

---

* आदानं हि विसर्गाय सतां वारिमुचामिव ।

# कथा सहावी·

## सोन्याचा पाऊस !



वरतंतु नांवाचे एक विद्वान् ऋषि होते. त्यांचा कौत्स नामक एक शिष्य होता. तो चौदा विद्यांत पारंगत झाल्यावर, गुरुजींनीं त्याला 'गृहस्थाश्रमांत पाऊल ठेवण्यास हें वय योग्य आहे, व त्या आश्रमांत सर्वांवर उपकार करितां येतो' असा उपदेश करून प्रेमानें निरोप दिला. निघतांना त्याला असा विचार पडला कीं, गुरुवर्यांच्या ऋणांतून कसें मुक्त व्हावें? म्हणून गुरुदक्षिणा मागण्याविषयीं तो वरतंतूंना फारच आग्रह करूं लागला. तेव्हां 'तूं माझी आजवर एकनिष्ठेनें सेवा केलीस व पंडित झालास यांतच मला सर्व कांहीं मिळालें, व हीच माझी गुरुदक्षिणा' असें त्यास त्यांनीं पुष्कळ प्रकारें सांगून पाहिलें; पण कौत्स कांहीं केल्या ऐकेना व आपणांस काय दक्षिणा देऊं असें पुनः पुनः विचारूं लागला. तेव्हां मुनिवर्यांनीं रागावून म्हटलें, "मीं दक्षिणा घ्यावी असा तुझा आग्रहच असेल, तर तुला शिकविलेल्या एकेका विद्येबद्दल एकेक कोटी, याप्रमाणें चौदा विद्यांबद्दल चौदा कोटी द्रव्य मला आणून दे."

'गुरुजींची आज्ञा' असें म्हणून तेवढें धन मिळविण्यासाठीं कौत्स तपोवनांतून बाहेर पडला.

याच सुमारास रघुराजानें दिग्विजयानंतर विश्वजित् यज्ञ करून ब्राह्मणांकडून आपलें सर्वस्व लुटविलें होतें, यामुळें दानधर्माबद्दल त्याची कीर्ति दिगंत गाजत होती. ती ऐकून कौत्स मोठ्या आशेनें त्याच्याकडे गेला; पण पाहतो तों राजा सर्वथा द्रव्यहीन झालेला ! कौत्साला पाहून

मृत्तिकापात्रांत पूजाद्रव्य घेऊन रघु राजा आदरानें अतिथीचें स्वागत करण्यास पुढें आला आणि त्याची विधिपूर्वक अर्चना करून त्याला हात जोडून म्हणाला,

"हे तपोधना, ज्यांच्यापासून आपण सर्व ज्ञान संपादन केलें त्या आपल्या गुरुजींचें कुशल आहे ना ? त्यांचें कायिक, वाचिक व मानसिक तप निर्विघ्नपणें चाललें आहे ना ? पुत्रवात्सल्यानें वाढविलेल्या आश्रमांतील वृक्षवेलींना वादळापासून किंवा वणव्यापासून कांहीं उपद्रव होत नाहीं ना ? तुमच्या अंगाखांद्यावर खेळणाऱ्या हरिणींच्या पाडसांना कोणापासून त्रास होत नाहीं ना ? ज्यांमध्यें तुम्ही स्नानादि क्रिया करतां त्या पवित्र जलाशयांना कोणाचा उपसर्ग होत नाहीं ना ? हे महर्षे, आपल्या केवळ आगमनानें माझ्या मनाला तृप्ति होत नाहीं. मजकडून आपली कांहीं सेवा व्हावी अशी मनीषा आहे. गुरुजींनीं कांहीं आज्ञा केली असेल तर ठीकच आहे, नाहींपेक्षां तुम्हांला स्वतःला कांहीं हवें असेल तर तें सांगा."

रघूचें हें उदार व गोड भाषण कौत्सानें ऐकून घेतलें, पण राजाच्या हातांत अर्घ्यपात्र मातीचेंच आहे हें पाहून आपली इच्छा येथें कशी काय सफळ होते याविषयीं त्याचें मन साशंक होऊं लागलें. तथापि रघूच्या प्रश्नांना तो उत्तरें देऊं लागला. तो म्हणाला,

"हे राजा, आमचें सर्वप्रकारें ठीक चाललें आहे. तूं रक्षणकर्ता असतांना प्रजाजनांना कोणाचें भय असणार ? सूर्य प्रकाशत असतांना लोकांना अंधकाराचा उपद्रव होईल तरी कसा ?* हे महाभाग, याचकांविषयींची भक्ति हें तुझें कुलव्रत असून तींत तूं आपल्या पूर्वजांना मागें टाकिलें आहेस. पण मी जो याचना करावयास आलों तो दानाची वेळ

---

* सूर्ये तपत्यावरणाय दृष्टेः कल्पेत लोकस्य कथं तमिस्रा ।

राजा बोलल्याप्रमाणें करणार असें निश्चित समजून त्याच्या सांगण्याप्रमाणें कौत्सानें तेथेंच वास्तव्य केलें आणि रघूहि अर्थप्राप्तीचा कांहीं तरी नवीन मार्ग काढण्याच्या विचारास लागला. पृथ्वीवरील राजांपासून त्यानें पूर्वींच द्रव्य काढलें होतें. म्हणून आतां आपली दृष्टि धनाधिपति कुबेराकडे वळवावी असें त्यानें ठरविलें. वसिष्ठाच्या कृपेनें त्याच्या रथाची गति, पर्वत असो, समुद्र असो वा अंतरिक्ष असो, सर्वत्र अकुंठित होती. मनांत आल्याबरोबर लगेच सर्व सिद्धता करून शस्त्रास्त्रांनीं युक्त अशा रथांत त्यानें रात्रौ व्रत-पुरःसर प्रस्थान ठेविलें.

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं कुबेराला जिंकावयास तो निघणार इतक्यांत एक अद्भुत चमत्कार झाला. त्याच्या कोषाध्यक्षांनीं त्याला येऊन सांगितलें कीं, 'महाराज, आपलें कोषागार आकाशांतून पडलेल्या सुवर्णानें भरून गेलें आहे!' तें ऐकून रघु कोषगृहाशीं येऊन पाहतो तों तेथें वज्रानें फोडलेल्या मेरूच्या टेकडीप्रमाणें सोन्याची रास त्याला दिसली! रघूच्या भयानें कुबेरानेंच ती तेथें टाकिली होती. ती सगळीच्या सगळी रघूनें कौत्साला अर्पण केली. पण कौत्स कांहीं कमी निःस्पृह नव्हता. रघु आग्रहपूर्वक सोनें देत असतांहि अवश्य त्याहून अणुमात्र अधिक तो घेईना. दाता व याचक दोघेहि लोकोत्तर! उदार राजा व निःस्पृह याचक अशी ही अलौकिक जोडी पाहून अयोध्यावासी लोक आश्चर्यचकित झाले आणि 'धन्य रघुराजा, धन्य कौत्सऋषि' अशी दोघांचीहि ते स्तुति करूं लागले. मग रघूनें शेंकडों उंट व घोडे यांवर तें सर्व धन लादून तें कौत्साच्या बरोबर दिलें आणि तो स्वतः त्याच्यापुढें हात जोडून उभा राहिला. त्याच्या असामान्य औदार्यानें संतुष्ट होऊन कौत्सानें त्याची पाठ थोपटून म्हटलें—

"राजा, तुझा महिमा अतर्क्य आहे. संपत्तीचें न्यायानें अर्जन करून तिचें वर्धन, पालन आणि सत्पात्रीं दान अशीं चतुर्विध राजकर्तव्यें, तूं

करीत असल्यामुळें पृथ्वी तुझी मनीषा पूर्ण करीत आली आहेच; पण तूं स्वर्गापासूनदेखील आपले मनोरथ सफल करून घेतलेस हा तुझा प्रभाव खरोखर अपूर्व होय! अशा तुला कोणताहि आशीर्वाद देणें म्हणजे केवळ पुनरुक्ति होईल. तथापि तुझ्यासारखाच सर्वगुणसंपन्न पुत्र तुला होवो असा माझा तुला आशीर्वाद आहे."

इतकें बोलून कौत्सानें गुरुगृहीं प्रयाण केलें.

---

# कथा सातवी.

## शापमोक्ष व अस्त्रप्राप्ति



यानंतर अल्पावधींतच रघुराजाला यथाकाळीं पुत्र झाला. तो कार्तिकेयासारखाच कांतिमान् असून त्याचा जन्म ब्राह्म मुहूर्तावर झाला असल्यामुळें रघूनें ब्रह्मदेवाचें ' अज ' हेंच नांव त्याला ठेविलें.

रघूचें तेज पुत्रामध्यें तंतोतंत उतरलें होतें; तसेंच शौर्यहि; शरिराचा धिप्पाडपणाहि तसाच; किंबहुना पितापुत्रांमध्यें काडीइतकेंहि न्यूनाधिक्य नव्हतें. जणूं काय पुत्र म्हणजे एका दिव्यावर लाविलेला दुसरा दिवाच !*

रघूनें अजाच्या विद्याभ्यासाची व्यवस्था करून त्याला विविध विषयांचें ज्ञान देवविलें. त्यास तारुण्यदशा प्राप्त झाली तेव्हां तो विशेष मनोहर दिसूं लागला. या सुमारास विदर्भ देशाचा राजा भोज यानें आपली भगिनी इंदुमती हिचें स्वयंवर मांडून त्याकरितां राजपुत्र अजाला बोलावण्यासाठीं रघूकडे हेतुपूर्वक एक विश्वासू दूत पाठविला. भोज घराण्याशीं संबंध घडल्यास उत्तमच आहे व अजहि विवाहाला योग्य झाला आहे असें पाहून रघूनें त्याला सैन्यासह विदर्भ राजधानीला पाठवून दिलें.

वाटेंत ठिकठिकाणच्या लोकांनीं अजाचा आदरसत्कार करून त्याची नीट व्यवस्था ठेविली. त्यामुळें आपण जणूं काय आपल्या उद्यानांतून विहार करीत चाललों आहों असें त्यास वाटलें. कांहीं मार्ग चालून गेल्यावर एक दिवस त्याचा निवास नर्मदातटाकीं पडला. तेथें त्याचें थकलेंभागलेलें सैन्य विसांवा घेत पडलें असतां नर्मदेच्या प्रवाहांतून एक

---

* प्रवर्तितो दीप इव प्रदीपात् ।

प्रचंड वन्य गज अकस्मात् उसळून बाहेर आला. ऋक्षवत् पर्वताच्या तटावर त्यानें आपलें गंडस्थळ घासल्यामुळें तेथील माती त्याच्या कपाळावर लागली होती व पर्वतावरील दगडावर दांत आपटल्यामुळें ते बोथटले होते. तो मोठ्यानें शब्द करीत व आपली सोंड मागेंपुढें फिरवीत अजाच्या निवासाकडे येऊं लागला. तो नदींत डुंबल्यामुळें त्याच्या गंडस्थळांतून वाहणारा मद धुऊन गेला होता. रघूच्या सैन्यांतील नागरहस्ती त्याच्या दृष्टीस पडतांच त्याच्या मदाला पुनः भर आला व त्याच्या उग्र वासानें तें ठिकाण दरवळून गेलें. अजाच्या हत्तींना तो वास असह्य झाला. ते आपलीं मुखें फिरवूं लागले व आपल्या महातांनाहि आवरतनासे झाले. ते शेपट्या वळवून पळूं लागले. शिबिरांत जिकडे तिकडे धावपळ सुरू झाली. उंट, घोडे, बैल यांची त्रेधा तर विचारूं नका. रक्षकांना स्त्रियांच्या संरक्षणाची पंचाईत पडूं लागली. रथांचे व गाड्यांचे आंस मोडून पडले. तेव्हां अज स्वतः पुढें सरसावला व त्या रानहत्तीला परतविण्याचा प्रयत्न करूं लागला. त्याचा वध अजाला करितां आला असता, पण राजानें वनगजाचा वध करूं नये अशी शास्त्राज्ञा असल्यामुळें त्यानें त्याच्या गंडस्थळावर लागेल अशा बेतानें हळूच एक बाण अचूक सोडला. त्यानें विद्ध होतांक्षणींच त्याचें हस्तिस्वरूप नाहींसें झालें व तेजःपुंज गंधर्वाचें सुंदर रूप धारण करून तो उभा आहे असें सर्वांना दिसलें. तें पाहून सर्वजण विस्मित झाले.

नंतर त्या गंधर्वानें स्वसामर्थ्यानें कल्पवृक्षाचीं फुलें आणून त्यांचा अजावर वर्षाव केला आणि तो अजाशीं बोलूं लागला. तो म्हणाला, "राजपुत्रा, विस्मय पावण्याचें कारण नाहीं. खरोखर मी मूळचा गंधर्व. माझें नांव प्रियंवद व माझ्या पित्याचें नांव प्रियदर्शन. मतंग ऋषीचा मी अवमान केल्यामुळें मला मतंगजाचा देह प्राप्त झाला होता. ऋषींनीं शाप दिला

असतां अनुतापपूर्वक मी जेव्हां त्यांस प्रणिपात केला तेव्हां ते पुनः शांत झाले. उघडच आहे. पाण्यांत उष्णपणा दिसला तर तो केवळ सूर्याच्या किंवा अग्नीच्या संपर्कामुळेंच उत्पन्न झालेला असतो; पण त्याचा नैसर्गिक धर्म म्हणजे थंडपणाच.* मुनींना स्वाभाविक अशी शांतता प्राप्त होतांच त्यांनीं उःशाप दिला कीं, इक्ष्वाकुवंशोत्पन्न राजपुत्र अज आपल्या शरानें जेव्हां तुझ्या गंडस्थळाचा वेध करील तेव्हां तुला तुझें पूर्वस्वरूप प्राप्त होईल. अजा, शापापासून तूं आज माझी मुक्तता केलीस म्हणून मी तुला फार धन्यवाद देतों. मी तुझी वाटच पाहात होतों. आतां माझी एवढीच इच्छा आहे कीं, मीं तुझें कांहीं तरी प्रिय करावें. नाहींतर मजकडे कृतघ्नतेचा दोष येईल. यास्तव हे मित्रा, शत्रूला मूर्च्छित करण्याचें 'संमोहन' नांवाचें अस्त्र मी तुला देतों. त्याचा तूं कृपाकरून स्वीकार कर; हें सोडण्याचा व आवरण्याचा विधि निरनिराळ्या प्रकारचा आहे तो तुला सांगतों. याच्यायोगानें प्रतिपक्षाचा नाश न करितां त्याच्यावर विजय मिळवितां येतो. तूं मजवर प्रहार केलास म्हणून हें अस्त्र घेण्यास मुळींच संकोच करूं नकोस. कारण माझ्यावर दया करून माझा वध न करतां केवळ माझ्या कपोलावरच तूं आघात केलास. हा माझ्यावर अपकार नसून उपकारच झाला आहे. तरी माझ्या विनंतीचा अव्हेर न करितां माझ्या अल्प देणगीचा स्वीकार कर."

अजहि अस्त्रवेत्ता होता. गंधर्वाची विनंती ऐकून तो 'ठीक आहे' असें म्हणाला आणि उत्तराभिमुख होऊन उदकस्पर्शपूर्वक त्यानें गंधर्वापासून तो अभिनव अस्त्रमंत्र घेतला.

---

* उष्णत्वमग्न्यातपसंप्रयोगात् शैत्यं हि यत् सा प्रकृतिर्जलस्य ।

ह्याप्रमाणें अज व गंधर्व यांचें दैववशात् अकल्पित सख्य झालें. त्यांनीं एकमेकांचा निरोप घेतला आणि मग तो गंधर्व कुबेरोद्यानाकडे गेला व कुमार अज रम्य अशा विदर्भ देशाची वाट चालूं लागला.

---

# कथा आठवी.

## स्वयंवर

—*—

राजपुत्र अज आपल्या नगराच्या अगदीं समीपभागीं येऊन पोंचला आहे असें समजतांच विदर्भ देशाच्या भोजराजाला अत्यानंद झाला व तो त्याला सामोरा जाऊन सन्मानपूर्वक नगरांत घेऊन आला. त्या वेळीं तेथें जमलेल्या लोकांना असें वाटलें कीं, जणूं भोज हा पाहुणा आहे व अज हाच विदर्भाधिपति होय !

भोज राजानें त्याच्यासाठीं स्वतंत्र भव्य तंबू ठोकले होते, त्यांत जाऊन तो उतरला. अजाचा एकंदर आविर्भाव पाहून स्वयंवरार्थ आलेल्या इतर राजांना मत्सर वाटूं लागला. त्यांना रात्रीं नीटशी झोंपहि आली नाहीं ! अज मात्र स्वस्थ झोंपला होता. पहाटेस त्याच्या गुणवर्णनात्मक पद्यें गाऊन गानकुशल भाटांनीं त्याला जागें केलें.

जागा झाल्यावर आह्निक विधि आटोपून आणि स्वयंवरास उचित असा वेष परिधान करून तो मंडपांत गेला आणि राजसमाजामध्यें आपल्यासाठीं ठेवलेल्या रत्नखचित मंचकावर जाऊन बसला. तेव्हां ह्या मदनासारख्या सुंदर तरुणाला सोडून इंदुमती आपणांस कसची वरते असें मनांत म्हणून इतर राजे लोक अगदीं हताश झाले. ज्याच्या गंडस्थळांतून एकसारखा मदस्राव चालला आहे असा एखादा गंधद्विप पाहिल्यावर पुष्पवृक्ष सोडून भ्रमर त्याच्यावर जाऊन पडतात त्याप्रमाणें इतर राजमंडळाला सोडून एका अजाचेच ठिकाणीं पौरजनांची दृष्टि खिळून राहिली. शंख, भेरी इत्यादिकांचा मंगल सुस्वर ध्वनि ऐकूं येऊं लागला; ही मेघ-

गर्जना आहे कीं काय असें वाटून नगराबाहेरील उद्यानांत संचार करणारे मोरांचे कळप नर्तन करूं लागले. चंदनाचा धूप सर्वत्र मंडपांत खेळून मंडपावर लावलेल्या पताकांच्याहि वर जाऊन पसरूं लागला. मधुर कंठाचे बंदिजन तेथें जमलेल्या सूर्यचंद्रवंशीय राजांचीं चरित्रें गाऊं लागले.

इतक्यांत विवाहोचित अशीं उंची वस्त्रें धारण करून इंदुमतीनें मंडपांत प्रवेश केला. तेव्हां तिनें तत्काळ सहस्रावधि नेत्र आपणांकडे आकर्षून घेतले. त्या वेळीं राजवृंदाचे देह मात्र आसनांवर राहिले, पण त्यांचीं अंतःकरणें इंदुमतीला जाऊन बिलगलीं. याचें कारण विधात्यानें आपलें सर्व निर्माणचातुर्य जणूं काय तिच्यांतच ओतलें होतें !

इंदुमतीचें लक्ष्य आपणांकडे वेधावें व तिनें आपणांस वरावें अशा प्रबळ लालसेनें सर्व राजांचे प्रयत्न चालू झाले. कोणी एक राजा कमलपत्रें हातांत घेऊन गरगर फिरवूं लागला; कोणी पायानें सुवर्णासनावर कांहीं लिहूं लागला; कोणी आपला किरीट डोक्यावर जेथल्या तेथें चांगला बसला असतांहि पुनः पुनः हातानें फिरवून बसवूं लागला. पण या त्यांच्या अवलक्षणी चाळ्यांकडे ढुंकूनहि न पाहतां इंदुमती पुढें चालली.

इंदुमतीची सुनंदा नामक प्रौढ व वाक्चतुर सखी होती. तिला एकाद्या विद्वानाप्रमाणें अखिल राजेलोकांचे वंश व चरित्रें अवगत होतीं. तिनें इंदुमतीला प्रथम मगधराजापाशीं नेऊन त्याचा वृत्तान्त तिला निवेदन केला. ती म्हणाली—

"हा मगधदेशाचा महापराक्रमी राजा परंतप; आपल्या प्रजेला संतुष्ट ठेवून यानें मोठा लौकिक संपादन केला आहे. विपक्षावर पराक्रम गाजवून यानें आपलें 'परंतप' नांव यथार्थ केलें आहे. यानें अनेक

यज्ञ करून पुण्यसंचय केला आहे. पृथ्वीवर इतर सहस्त्रावधि नृपति आहेत, पण ‘ राजन्वती ’ ही पदवी याच्या राज्यभूमीलाच साजेशी आहे. नक्षत्रें, तारे आणि ग्रहगण यांनीं रात्र व्याप्त असली तरी ती चंद्रामुळेंच प्रकाशमान होते.”*

हें वर्णन ऐकून इंदुमतीनें त्याच्याकडे नुसतें पाहून त्यास प्रणिपात केला व कांहींएक न बोलतां ती पुढें चालली.

तेथून सुनंदा तिला घेऊन अंगदेशाच्या राजाजवळ आली व म्हणाली,

“हा पाहा अंगदेशाचा राजा. यानें कुशल गजवेत्त्यांकडून मोठें गजसैन्य सिद्ध केलें असून हा इंद्रासारखें ऐश्वर्य भोगीत आहे. लक्ष्मी व सरस्वती ह्या प्रायः एकत्र आढळत नसल्या तरी त्या नियमाला हा राजा अपवाद आहे. † याच्या ठिकाणीं त्या दोघी सुखानें नांदत असल्यामुळें तुझी तिसरीची योजना त्यांच्या जोडीला होणें हें यथोचितच होईल.”

अंगराजाचें हें वर्णन ऐकून इंदुमती सुनंदेला नुसतें ‘ पुढें चल ’ असें म्हणाली. पण यावरून तो अंगराजा रूपवान नव्हता असें नाहीं, किंवा इंदुमतीला पारख करतां येत नव्हती असेंहि समजावयाचें नाहीं; तर प्रत्येकाची आवडनिवड निरनिराळी असते एवढेंच खरें. §

पुढें सुनंदा उज्जयिनीच्या राजापुढें येऊन थबकली व म्हणाली, ‘ हा अवन्तीनाथ. याचें निवासस्थान चंद्रमौली महाकालाच्या संन्निध असल्यामुळें, याला कृष्णपक्षांतदेखील रात्रौ चंद्रप्रकाशामध्यें विहार करितां येतो.

---

* नक्षत्रताराग्रहसंकुलापि ज्योतिष्मती चंद्रमसैव रात्रिः ।

† निसर्गभिन्नास्पदमेकसंस्थमस्मिन् द्वयं श्रीश्च सरवस्तीच ।

§ भिन्नरुचिर्हि लोकः ।

“हा राजपुत्र ककुत्सवंशांत जन्मलेला आहे. ककुत्स राजा पुरंदर इंद्राचा मोठा साह्यकर्ता होता. सर्व भूपालांत तो श्रेष्ठ असल्यामुळें त्याला ककुत्स ( ककुद् म्हणजे—श्रेष्ठ ) असें म्हणत. त्याच्यावरून याच्या वंशाला ककुत्सवंश असें म्हणतात. त्याच्या कुलांत पुढें जन्मलेला दिलीप हा मोठा कीर्तिमान् असून त्यानें नव्याण्णव अश्वमेध केले. दिलीपाचा पुत्र रघु यानें विश्वजित् यज्ञामध्यें सर्वस्वाचें दान करून इतकें अपार यश मिळविलें कीं, त्यानें केवळ भूगोलच नव्हे तर त्रिभुवन व्यापून टाकिलें ! हा अज त्याचा पुत्र. कुलानें, लावण्यानें, वयानें व विनयादि सकल गुणांनीं हा तुला सर्वस्वी अनुरूप आहे. याला तूं वरल्यास रत्नाला सुवर्णाच्या कोंदणांत बसविल्यासारखें होईल.”*

सुनंदेचें हें गुणवर्णन चाललें असतां इंदुमती लाजून किंचित् खालीं मान घालून उभी होती. तिनें सुनंदेचें भाषण संपल्यावर लज्जा थोडी दूर सारून प्रसन्नवदनानें अजाकडे पाहिलें व दृष्टिरूपी माळच त्याच्या गळ्यांत घातली. स्त्रीसहज शालीनतेमुळें तिला अजाविषयींचें आपलें प्रेम शब्दानें व्यक्त करितां आलें नाहीं, पण तिच्या अंगावर उभ्या राहिलेल्या रोमांचानें तें व्यक्त केलें. तें पाहून तिची थोडी थट्टा करावी असें मनांत आणून सुनंदेनें तिला ‘ आर्ये, इथें उभें राहून काय करायचें ? पुढें चल ’ म्हणून म्हटलें. हे सुनंदेचे शब्द अर्थातच इंदुमतीला रुचले नाहींत. तिनें सक्रोध मुद्रेनें सुनंदेकडे पाहूनच आपलें मनोगत दर्शविलें आणि आपल्या प्रेमाचें मूर्तिमंत निदर्शक म्हणून सुनंदेच्या हातूनच अजाच्या कंठांत मंगलमाला घातली. हा मंगल पुष्पहार आपल्या गळ्यांत पडलेला पाहून अजाला धन्यता वाटली व इंदुमतीनें बाहुपाशानेंच जणूं आपल्या कंठाला मिठी मारली आहे असें त्यास वाटलें !

---

* रत्नं समागच्छतु काञ्चनेन ।

हें रम्य दृश्य पाहून पौरजनांना निरतिशय आनंद झाला. गंगेचा सागराशीं संगम झाला किंवा चंद्रिका चंद्राला जाऊन मिळाली असेंच त्यांपैकीं प्रत्येकास वाटलें. पण त्यांचे प्रशंसोद्गार जमलेल्या राजांना मात्र कर्णकटु लागून ते कावरेबावरे झाले आणि पुढें काय करावें हें त्यांस सुचेना. आपलें रूप निष्फळ होय, या थाटमाटाचा काय उपयोग असा स्वतःस बोल लावीत ते आपापल्या शिबिराला निघून गेले.

---

# कथा नववी

## विवाहसमारंभ व प्रतिपक्षाचें पारिपत्य



ह्याप्रमाणें स्वयंवराचा विधि उरकल्यावर भोज राजानें आपली भगिनी व अज यांसह शहरांत पुनः प्रवेश केला. त्यांचें स्वागत करण्यास हजारों प्रजाजन सामोरे आले होते. रस्त्यावर पाणी शिंपडून सर्व नगर शृंगारलें होतें. ठिकठिकाणीं उभारलेलीं गुढ्यातोरणें सूर्यप्रकाशांत इंद्रधनुष्याप्रमाणें चमकत असून ध्वजपताकांच्या छायेनें उन्हाचा यत्किंचितहि ताप भासत नव्हता.

या नूतन वधूवरांची मिरवणूक पाहण्यासाठीं राजमार्गावरील दोन्ही बाजूंचे वाडे आबालवृद्ध स्त्रीपुरुषांनीं फुलून गेले. स्त्रियांची धांदल तर विचारूच नका. त्या आपापलीं कामें सोडून धावत आल्या. एक स्त्री केशकलाप सोडून वेणी घालीत असतां अजाला अवलोकन करण्यासाठीं तशीच केस हातांत धरून आली. एका स्त्रीनें तर उजव्या डोळ्यांत काजळ घातलें व डाव्यांत घालावयाचें विसरून काजळ घालण्याची सळई हातांत घेऊन ती तशीच धावत आली. अशा रीतीनें राजपथावरील दोन्ही बाजूंच्या खिडक्या स्त्रीजनांनीं गच्च भरून गेल्या व त्यामुळें तेथें भ्रमरयुक्त कमळें लटकाविलीं आहेत कीं काय असा भास झाला.

या जोडप्याकडे न्याहाळून पाहात असतां पौरवधूंना अपरिमित आल्हाद झाला. त्यांच्या इतर इंद्रियांचे व्यापार स्तब्ध राहिले व त्यांनीं आपापली कामगिरी नेत्रांकडेच सोपविली. या आनंदाच्या भरांत त्या म्हणूं लागल्या कीं, "हा जोडा कसा लक्ष्मीनारायणासारखा शोभतो आहे ! हीं एकमेकांना किती अनुरूप आहेत ! खरोखर इन्दुमती म्हणजे रति आहे व अज

हा अज नसून मदनच आहे. एरव्हीं यांचा संयोग कसा घडला असता ? जन्मांतरींच्या गांठीच येथें पडल्या म्हणावयाच्या;* ब्रह्मदेवानें यांच्या गांठी घातल्या नसत्या, तर त्याच्यासारखा अप्रयोजक तोच ठरला असता !"

अशा तऱ्हेचे स्त्रियांच्या मुखांतून निघालेले प्रशंसोद्गार ऐकत ऐकत अज हा भोजराजाच्या प्रासादापाशीं येऊन ठेपला. तेथें तो हत्तिणीवरून उतरल्यावर त्याचा हात धरून भोजानें त्याला एका चौकांत नेलें आणि एका रत्नजडित सिंहासनावर त्याला बसविलें. मग त्याची मधुपर्कयुक्त पूजा करून त्यानें त्यास बहुमूल्य रेशमी वस्त्रें समर्पण केलीं. तीं परिधान करून अज अग्निसमीप आला. तेथें त्याच अग्नीला साक्षी ठेवून भोजाच्या अग्नितुल्य उपाध्यायांनीं वधूवरांचा विधिपुरःसर विवाहसंस्कार केला. इंदुमतीचा हात अजाच्या हातांत पडला असतां उभयतांनाहि सात्त्विक आनंद होऊन त्यांचीं गात्रें फुललेल्या अशोकवृक्षाप्रमाणें रोमांचित झालीं. नंतर दोघांनीं प्रज्वलित झालेल्या होमाग्नीला प्रदक्षिणा घातली व त्यांत लज्जायुक्त अशा इंदुमतीनें लाजांचा होम केला.

याप्रमाणें बहिणीचा लग्नसोहळा पूर्ण झाल्यावर स्वयंवरासाठीं आलेल्या इतर भूपालांचाहि भोजानें यथोचित सत्कार केला आणि तेहि त्यास परत-भेटी देऊन स्वस्थळीं जावयास निघाले. पण त्यांच्या मनांत अजाविषयीं उत्पन्न झालेला मत्सर डांचतच राहिला. दुसरें असें कीं, रघूनें त्यांची संपत्ति हरण केल्यामुळें त्यांचा पूर्वींपासूनच रघुकुलावर रोष झाला होता. अजाची पाठवणी करतांना विदर्भाधिपतीनें त्याच्या रक्षणार्थ कांहीं अंतरापर्यंत जावयाचें ठरविलें होतें; त्याप्रमाणें तीन दिवस तो त्याच्यासमागमें गेला व मग तेथूनच परत फिरला. ही संधि साधून

* मनो हि जन्मान्तरसंगतिज्ञम् ।

आतां अज एकटाच आहे, तेव्हां त्याच्यावर चाल करावयास हरकत नाहीं असें त्या राजांना वाटलें व त्यांनीं जरा पुढें होऊन अजाची वाट रोखून धरली. तेव्हां पत्नीच्या संरक्षणासाठीं कांहीं निवडक सैन्य ठेवून बाकीच्या सैन्यासह अज लगेच त्या राजांवर तुटून पडला.

युद्धास तोंड लागलें. पायदळ पायदळाशीं भिडलें; रथी रथ्यांवर धावले; घोडेस्वार घोडेस्वारांबरोबर व हत्तीस्वार हत्तीस्वारांशीं झुंजूं लागले. रणवाद्यांचा कडकडाट चालू झाला. या कर्णभेदी निनादामुळें योद्धयांना आपापलीं नांवें प्रतिपक्षाला कळवितां येईनात. तेव्हां त्यांनीं स्वनामांकित बाण सोडूनच तें काम केलें.

अशा प्रकारचें निकराचें युद्ध चाललें असतां घोड्यांच्या खुरांनीं धूळ उडूं लागली; तींत रथांच्या चाकांमुळें उठलेले धुळीचे लोळ मिळाले आणि त्यांना हत्तींच्या कानांच्या हलकाऱ्यामुळें ऊर्ध्वगति मिळून ते आकाशांत गेले व सहस्त्ररश्मीला त्यांनीं झांकून टाकिलें. हत्तींच्या विशाल दंतांवर खड्गांचा आघात होऊन त्यांपासून ठिणग्या उडूं लागल्या. रथाच्या खडखडण्यावरून हा रथ आहे असें कळून येई; घंटानादावरूनच येथें हत्ती आहे हें ओळखावें लागे; आणि आपल्या राजाचें नांव ललकारणाऱ्या योद्धयावरून हा अमुक एक सैनिक स्वपक्षीय आहे कीं परपक्षीय आहे याची ओळख पटे !

शस्त्रास्त्रांनीं घायाळ झालेले वीर, अश्व व गज यांच्या शरीरांतून रक्ताचे पाट वाहूं लागले आणि रणभूमीला यमराजाच्या पानभूमीचें स्वरूप प्राप्त झालें. एक वीर तर खड्गानें मुंडकें तुटल्यावर स्वर्गास गला व तेथूनच आपलें धड युद्धभूमीवर नाचत असलेलें पाहूं लागला. दुसरे दोघे रथी लढत असतां त्यांचे सारथी ठार झाले, तेव्हां ते स्वतःच

सारथी बनले; पुढें रथाचे घोडे मरून पडल्यावर ते गदायुद्ध करूं लागले आणि मग गदा मोडून पडल्यामुळें त्यांचें बाहुयुद्ध सुरू झालें. अखेरीस दोघांचेंहि प्राणोत्क्रमण एकाच क्षणीं होऊन ते एकदमच स्वर्गी गेले; व तेथेंहि पण एकाच अप्सरेच्या प्राप्तीकरितां भांडूं लागले !

या रणसंग्रामांत अजानेंहि आपलें युद्धकौशल्य उत्कृष्ट रीतीनें प्रकट केलें. तो आपला हात बाणाला लावी केव्हां व काढी केव्हां हे मुळींच समजत नसे. शत्रूंच्या हजारों मस्तकांचा थर पाडून त्यानें रणभूमि आच्छादून टाकिली. तेव्हां मात्र सगळे राजे एक होऊन त्याच्यावर तुटून पडले. त्याचा रथ शरांनीं झांकून गेला. तथापि ध्वजाच्या टोकावरून तो ओळखूं येत असे. शत्रुपक्षानें अतीच कहर केलेला पाहून शेवटीं अजानें आपल्या नूतन गंधर्वमित्राकडून प्राप्त झालेलें संमोहनास्त्र त्यांच्यावर सोडिलें; त्याबरोबर समस्त रिपुसैन्य निद्रावश होऊन गेलें.

अशा रीतीनें विजय प्राप्त झाल्यावर अजानें जोरानें शंख फुंकला. तेव्हां असें वाटलें कीं, हा वीरमणी स्वपराक्रमानें मिळविलेल्या मूर्तिमंत यशाचेंच जणूं प्राशन करीत आहे. हा विजयसूचक शंखनाद ऐकून आपला स्वामी यशस्वी झाला असें त्याच्या सैनिकांना दिसून आलें. मग अजानें रक्तानें भरलेल्या बाणाग्रांनीं प्रतिपक्षाच्या ध्वजांवर असें लिहविलें कीं, ' हे नरदेवहो, तुमचें यश मात्र मीं हरण केलें आहे, पण तुमच्यावर कृपाकरून तुमचे प्राण ठेविले आहेत. "

हा सारा युद्धचमत्कार चालला असतां इंदुमतीची भीतीनें अगदीं गाळण उडाली होती. तेव्हां तिला धीर द्यावा म्हणून अज त्वरेनें तिच्याकडे आला व आपल्या कपाळावरील घर्मबिंदु पुशीत पुशीत तो तिच्याशीं बोलूं लागला. तो म्हणाला, " प्रिये, आतां घाबरण्याचें

मुळींच कारण नाहीं. तूं माझ्या हातांत एकदां आल्यावर यांच्या काय तावडींत सांपडणार? या राजांच्या हातचीं शस्त्रें आतां पोरांसोरांनींहि काढून घ्यावीं अशी स्थिति यांना प्राप्त झाली आहे."

याप्रकारें शत्रुभय एकाएकीं नष्ट झालेलें पाहून इंदुमतीचें मुख पूर्ववत् टवटवीत झालें. पतीचा अतुल पराक्रम प्रत्यक्ष पाहून ती जरी प्रहृष्ट झाली होती, तरी लज्जावश झाल्यामुळें तिला त्याची स्वमुखानें प्रशंसा करितां येईना. म्हणून तिनें आपल्या सख्यांकडूनच त्याचें अभिनंदन करविलें.

ह्याप्रमाणें अजानें स्वविक्रमानें इतर राजांना पादाक्रांत केलें व विदर्भसुंदरीचा लाभ करून घेतला.

---

# कथा दहावी

## यति व राजा



कुमार अज इंदुमतीसमागमें अयोध्येस आल्यावर त्यानें अनुरूप पत्नी व विजय मिळविल्याबद्दल रघूनें त्याचें अभिनंदन केलें. सूर्यकुलोत्पन्न राजांची अशी रीत असे कीं, पुत्र राज्यभार वाहण्यास समर्थ झाल्यावर ते गृहस्थाश्रमांत राहात नसत. तदनुसार रघूलाहि वानप्रस्थ होण्याची इच्छा झाली व त्याप्रमाणें गृहप्रवेशाच्या समयींच मुलाला राज्याभिषेक करवून त्यानें वनाचा मार्ग धरिला. इतर राजपुत्र, जें स्वाधीन करून घेण्यासाठीं पापमार्गाचाहि अवलंब करण्यास मागें पुढें पाहात नाहींत, तें राज्य अजाला सुलभपणें प्राप्त झालें असतां त्यानें केवळ पित्राज्ञा म्हणून त्याचा स्वीकार केला; राज्यभोगाची हाव त्याच्या ठायीं लवमात्र नव्हती.

अज हा राजा झाला असें पाहून प्रजाजनांना धन्यता वाटली. पण वसिष्ठासारखा ब्रह्मतेज:संपन्न मंत्री आणि अजासारखा क्षत्रतेज:संपन्न राजा ही जोडगोळी पाहून शत्रूंचें धाबें दणाणून गेलें. कारण ब्राह्म व क्षात्र तेज यांचा संयोग म्हणजे पवन व अग्नि यांच्या संयोगासारखाच परिणामकारक असतो.*

अज राजाकडे बघून रघु राजाच तरुण होऊन परत आला कीं काय असें प्रजेला वाटूं लागलें. कारण रघूचें केवळ ऐश्वर्यच त्याला मिळालें नसून सगळे गुणहि त्यानें पित्यापासून उचलले होते. तो अत्यंत ममतेनें प्रजेचें पालन करूं लागला. इतकें कीं, आपणच काय ते राजाला प्रिय आहोंत असें प्रजेपैकीं प्रत्येक मनुष्याला वाटावें. त्याची

---

* पवनाग्निसमागमो ह्ययं सहितं ब्रह्म यदस्त्रतेजसा ।

शिस्त निष्कारण कडक नव्हती, तशीच अनाठायीं ढिलीहि नव्हती; मध्यम मार्ग चोखाळून, शत्रूचा समूळ नाश न करितां, त्यांना तो आपल्या केवळ स्वाधीन ठेवीत असे.

ह्याप्रमाणें पुत्र राज्यावर सुप्रतिष्ठित झालेला पाहून रघला पूर्ण समाधान झालें. त्याला विनाशी अशा ऐहिक विषयांप्रमाणें स्वर्गीय विषयहि तुच्छ वाटूं लागले. तो अरण्यास जावयास निघाला तेव्हां अज त्याच्या पायां पडला व मला सोडून आपण जाऊं नका अशी त्यानें डोळ्यांत आसवें आणून विनंती केली. पण सर्प जसा एकदां टाकलेली कात पुनः परत घेत नाहीं त्याप्रमाणें एकदां सोडून दिलेले सांसारिक भोग स्वीकारण्यास रघूहि सिद्ध झाला नाहीं. तथापि मुलांचेंहि थोडेंसें ऐकल्यासारखें करावें म्हणून रघु संन्यास घेऊन नगराबाहेर जवळच एका आश्रमांत राहिला.

रघु राजा निवृत्तभोग झाला; व अज उत्कर्षाधिरूढ झाला. तेणेंकरून चंद्र अस्तास गेलेल्या व सूर्य उदयास आलेल्या आकाशाचें स्वरूपच त्या राज्यास प्राप्त झालें. रघु यतिवेषधारी आणि अज राजवेषधारी, पण दोघेहि धर्माचेच अवतार होत असें प्रजेला वाटलें; एकाचें साध्य मोक्ष व दुसऱ्याचें अभ्युदय, एवढाच भेद. रघु मुक्तिपदप्राप्त्यर्थ मुनिजनांच्या संगतींत काळ घालवी, तर अज न जिंकलेले देश जिंकण्याकरितां राजनीतिनिपुण मंत्रिमंडळाशीं खलबतें करी. रघु एकांतांत दर्भासनावर बसून ध्यानधारणा करी, तर अज राजसभेंत धर्मासनावर बसून न्यायदान करी. एकानें अंतस्थ पंचप्राण योगसाधनानें स्वाधीन करून घेतले, तर दुसऱ्यानें कोशदंडादि साधनानें बाह्य राजांना अनुकूल करून घेतलें. एकानें ज्ञानरूपी वह्नीनें प्राक्तन कर्में भस्मसात् करून टाकिलीं, तर दुसऱ्यानें युक्तिप्रयुक्तीनें प्रतिपक्षाचे व्यूह ढासळून

# कथा अकरावी

## पुष्पाघातानें मृत्यु !



पित्याच्या निधनानंतर अजाला एकटेंसेंच वाटूं लागलें. तथापि धीर धरून त्यानें राज्यधुरा उत्कृष्टपणें वाहून स्वराज्य निष्कंटक केलें. त्याच्या शासनाखालीं पृथ्वी अत्यंत सुपीक व समृद्ध झाली. इंदुमतीलाहि यथासमयीं पुत्ररत्न झालें. हा पुत्र दशशतरश्मि जो दिवाकर त्याच्यासारखा दीप्तिमान् होता; हा दाही दिशांमध्यें प्रसिद्ध होणार व याचा नंदन राम हा, दशकंठ जो रावण त्याचा वध करणार असें लक्षांत घेऊनच कीं काय, याचें नांव **दशरथ** असें ठेवण्यांत आलें.

असो. वेदाध्ययन, यज्ञयाग व पुत्रप्राप्ति यांच्या योगानें ऋषि, देवता व पितर यांच्या त्रिविध ऋणांतून अजानें आपल्याला मुक्त करून घेतल्यावर त्याला हलकेंसें वाटूं लागलें. त्यानें आपल्या बलाचा उपयोग दुःखितांच्या रक्षणार्थ केला; ज्ञान विद्वानांच्या सत्काराकडे लाविलें* आणि द्रव्य व इतर गुण यांचा विनियोग परोपकाराकरितांच केला.

अशा रीतीनें अज राजा निश्चिंत झाला असतां, एके दिवशीं तो देवी इंदुमतीसह आपल्या नगराबाहेरील उपवनामध्यें विहार करण्यासाठीं गेला. तेथें एका मनोरम स्थलीं तो सृष्टिशोभा पाहात बसला असतां, आकाशमार्गानें देवर्षि नारदमुनि वीणेच्या तारा छेडीत छेडीत चालले होते. त्यांना दक्षिण समुद्राच्या तीरावर असलेल्या गोकर्ण क्षेत्रांतील शिवमूर्तीचें ( गोकर्ण महाबळेश्वराचें ) दर्शन घ्यावयाचें होतें. त्यांच्या

---

* बलमार्तभयोपशांतये विदुषां सत्कृतये बहु श्रुतम् ।

वीणेच्या वरच्या भागावर दिव्य कुसुमांची माला लटकत होती. तिच्या त्या अद्भुत घमघमाटावर लुब्ध होऊनच कीं काय, वायूनें ती उडविली; अर्थात् त्या मालेवर बसलेले भुंगेहि तेणेंकरून दूर झाले. तेंव्हां, वेगवान् वाऱ्यानें माला हरण केल्यामुळें अपमान झालासें वाटून ती वीणा काजळानें काळे झालेले अश्रुच जणूं काय ढाळीत आहे असें वाटलें !

ती सुमनमाला विणेवरून जी निसटली ती अचूक इंदुमतीच्या हृदयावर येऊन पडली. आपल्या उरोभागीं पडलेली ती माळ क्षणमात्र पाहून इंदुमतीचें हृदय विव्हळ झालें व थोड्याच वेळांत तिनें आपले डोळे मिटले; असें वाटलें कीं, चंद्राला ग्रहण लागून चंद्रिका नष्ट झाली ! चैतन्य नष्ट झाल्यामुळें तिचें शरीर धाडदिशीं भूमीवर पडलें व तिला सावरण्यासाठीं अज पुढें होतांच तोहि मूर्च्छित होऊन पडला. हा शोकजनक प्रकार घडतांक्षणींच तेथील सारें वातावरण शोकमय होऊन गेलें. पक्षी करुणस्वरानें आक्रोश करूं लागले. सर्व उद्यान आर्तस्वरानें भरून गेलें. परिचारकांनीं वारा घातल्यावर अल्पकालानें अज शुद्धीवर आला; पण कांहीं केल्यानें इंदुमतीला मात्र चेतना येईना. आयुष्याची दोरी बळकट असेल तरच उपाय यशस्वी होणार; नाहींतर सारें व्यर्थ !*

पूर्ण सावध होऊन उठून बसल्यावर अजानें तारा नसलेल्या वीणेप्रमाणें निःशब्द झालेलें इंदुमतीचें मस्तक अंकावर ठेविलें आणि तो धैर्य सोडून तिच्यासाठीं धाय मोकलून रडूं लागला. लोहासारखा अचेतन पदार्थहि तप्त झाला असतां मऊ बनतो; मग हाडामासांच्या

* प्रतिकारविधानमायुषः सति शेषे हि फलाय कल्पते ।

प्राण्यांची तशी स्थिति झाल्यास त्यांत नवल तें काय ?* शोक करतांना तो म्हणाला—

"अंगावर फुलें पडून जर आयुष्याची दोरी तुटते, तर यमराजाला प्राण हरावयाला साधन म्हणून कोणतीच वस्तू त्याज्य वाटण्याचें किंवा वगळण्याचें कारण नाहीं. अथवा मृत्यूचेंसुद्धां करणें बरोबरच आहे. असल्या कोमल देहाचा नाश कुसुमांनीं करावयाचा नाहीं, तर कशानें बरें करावयाचा ? हीच कमलिनी पाहा; हिच्यावर दंवाचे थेंब पडले ते काय आणि ही सुकून गेली ती काय ! पण पुष्पमालेनें इचे प्राण हरिले म्हणावे, तर ही पाहा माझ्या हृदयावर मी ती ठेवतों. आतां मला ती कां बरें ठार करीत नाहीं ? देवाची इच्छा, दुसरें काय ? तो विषाचें अमृत करील किंवा अमृताचें विष करील,† काय सांगावें ? अथवा देवाला तरी बोल कां लावावा ? माझ्याच दुर्भाग्यानें हा वज्राघात झाला. पण चमत्कार असा कीं, या वज्राघातानें वृक्ष तसाच राहिला, पण त्याच्या आश्रयानें असलेली लता मात्र मोडून गेली !

हे प्राणप्रिये, मी तुझे शतशः अपराध केले, पण तूं मात्र माझा एकहि उलट अपराध केला नाहींस. पण आतां माझ्या हातून कांहींच प्रमाद घडला नसतां, अशी अकस्मात् माझ्यावर कां बरें रुसलीस ? माझ्याशीं दोन शब्द तरी बोल. माझें प्रेम कदाचित् वरकरणी असेल, मी खरोखर कपटी असेन असें तर तुला वाटलें नाहीं ना ? नाहींतर अशी मला सोडून व मला न सांगतांच तूं परलोकीं कशी गेली असतीस ? अशा ह्या माझ्या दुष्ट व कपटी जीविताला शिक्षा

---

* अभितप्तमयोऽपि मार्दवं भजते कैव कथा शरीरिषु ।

† विषमप्यमृतं क्वचिद्भवेदमृतं वा विषमीश्वरेच्छया ।

पाहिजेच. तें मूर्च्छावस्थेंत तुझ्या मागून गेलें असतां तुला घेतल्या-शिवाय परत कां आलें ? आतां त्याला प्रबळ दु:ख सहन करूं दे.

हे सुंदरि, श्रम झाल्यानें तुझ्या मुखावर आलेले स्वेदबिंदु अद्याप तसेच आहेत आणि तूं मात्र नष्ट झालीस. तेव्हां धिक्कार असो या प्राणिमात्रांच्या क्षणभंगुरतेला !* हे दयिते, मी तुझें असें काय वाकडें केलें आहे कीं, तूं मला असें सोडून जावेंस ? मला 'पृथ्वीपति' म्हणत असले तरी माझें खरेंखुरें प्रेम पृथ्वीवर नसून तुझ्यावरच आहे. हे पाहा तुझे काळेभोर कुरळे केस हलत आहेत; वाटतें कीं, चेतनाच तुझ्यामध्यें येऊं लागली ! तर हे प्रिये, जागी हो आणि माझें दु:ख नाहींसें कर. तुझ्या मुखांतून शब्द येत नाहीं; मस्तकावरील कुंतल मात्र कंप पावत आहेत. तें पाहून माझ्या हृदयाचें पाणी पाणी होत आहे. तुझा हा आत्यंतिक विरह मी सहन तरी कसा करूं ? हा विरह, चंद्र व निशा, किंवा चक्रवाक व चक्रवाकी यांच्या जोडप्याप्रमाणें अल्पकालीन असता तर मी तो सहन केला असता. हे स्मितवदने, ज्या तुझ्या कोमल अंगाला कोंवळ्या पानांची शय्याहि खुपत असे त्याला आतां हा चिताग्नि कसा सहन होणार ? तुझी विश्वासांतील मैत्रीण अशी ही नि:शब्द झालेली मेखला-देखील जणूं मृतवत् पडल्यासारखी वाटते. तुझ्या शोकामुळें तिनेंहि आपला प्राण सोडला म्हणावयाचा !

हे वल्लभे, तूं गेलीस तरी अनेक रूपांनीं मला येथें सर्वत्र दिसत आहेस. तुझें गोड भाषण कोकिलांच्या तोंडीं ऐकूं येत आहे. तुझी मंद गति कलहंसींनीं उचलली आहे; चंचल दृष्टि हरिणींनीं घेतली आहे;

---

* धिगिमां देहभृतामसारताम् ।

व तुझे क्रीडाविनोद लतांनीं स्वीकारले आहेत. अशा रीतीनें तूं आपले सगळे गुण माझ्यासाठीं ठिकठिकाणीं मागें ठेवून गेली आहेस खरी, पण प्रत्यक्ष तुझ्या अभावीं यांनीं माझें थोडेंच समाधान होणार आहे ? यांच्यावर माझें जीवित राहणें शक्य नाहीं. हा आम्रवृक्ष व ही प्रियंगुलता या जोड्याचा तूं विवाह लावून देणार होतीस ना ? पण तो विधि पूर्ण करण्यापूर्वींच तूं निघून गेलीस. हें ठीक केलेंस का ? ह्या अशोक वृक्षाचें कोडकौतुक तूं पुरविल्यामुळें तो फुलांनीं किती भरलेला दिसतो पाहा ! पण हाय हाय ! विधिघटना निराळीच होती ! अशोकाचीं हीं फुलें तुझ्या वेणींत न घालतां तुझ्या अंत्यविधीकडेच लावावीं लागणार ! हीं पुष्पें पाहावयास तूं नाहींस हें जाणूनच कीं काय, हा अशोक फुलांच्या रूपानें अश्रु गाळीत आहे !

तुझ्या दुःखानें दुःखी होणाऱ्या व तुझ्या सुखानें सुखी होणाऱ्या या तुझ्या मैत्रिणी, तसाच प्रतिपच्चंद्राप्रमाणें वर्धिष्णु असा हा तुझा पुत्र आणि तुझ्यावर एकनिष्ठ प्रेम करणारा मी, यांना टाकून तूं आपला निष्ठुर निश्चय पार पाडलासच. आतां मला धीर कुठला ? आतां मी कुणावर प्रेम करूं ? आतां माझ्या गाण्याचा काय उपयोग ? आणि या वसंतऋतूंत उत्सव तरी कसला करावयाचा ? आतां भूषणांचें तरी प्रयोजन काय उरलें ? मला सर्वत्र शून्याकार झालेलें दिसत आहे ! इंदुमति, तूं माझी केवळ गृहिणीच नव्हतीस. माझा मंत्री तूंच, माझा विश्वासू मित्र तूंच आणि ललितकला विषयांतील माझी प्रियशिष्या तूंच होतीस. तुला ओढून नेऊन या दुष्ट काळानें माझें सर्वस्वच हरिलें आहे. मला न देतां तूं कधीं कांहीं खाल्लें नाहींस कीं प्याली नाहींस; मग आतां मात्र मला सोडून तूं परलोकांत तिलांजलीचें पान करणार ना ? प्रिये, आजवर एवढ्या ऐश्वर्यामध्येंसुद्धां अजाला तुझ्या-

शिवाय कशानेंहि सुख होत नसे. माझी दुसऱ्या कशावरहि आसक्ति नसल्यामुळें माझे सर्व भोग म्हणजे सर्वस्वी तूंच होतीस. ”

ह्याप्रमाणें विलाप करितांना कोसलाधिपति अजानें तेथील वृक्षांनाहि आपल्या शोकाचें वांटेकरी केलें व ते मकरंदरूपी बाष्पबिंदु गाळूं लागले !

---

# कथा बारावी

## वसिष्ठांचा सांत्वनपर संदेश



मग अजाच्या आप्तेष्टांनीं इंदुमतीला कसेंबसें अजाच्या मांडीवरून उचललें आणि चंदनाची चिता रचून तिला अग्निसंस्कार दिला. अज राजा इतका शोकाकुल झाला होता कीं, तो पत्नीबरोबर सहगमनच करावयाचा; पण राजासारखा राजा असून यानें स्त्रीशोकानें सहगमन केलें या लोकनिंदेच्या भीतीमुळेंच केवळ त्यानें प्राणत्याग केला नाहीं. पुढें दहा दिवस करावयाची उत्तरक्रिया त्यानें उपवनांतच उरकून घेतली.

त्यानंतर दु:खविव्हल झालेला तो राजा, प्रभातकाळीं निस्तेज झालेल्या चंद्रासारखा फिक्कट होऊन नगरांत परत आला. त्याचें तें अनिवार दु:ख पाहून नागरिक स्त्रियांच्याहि नेत्रांतून अश्रुपूर वाहूं लागले !

या वेळीं गुरु वसिष्ठ आपल्या आश्रमांत कांहीं यज्ञकर्मांत गुंतले होते. म्हणून त्यांना स्वत: अजाच्या समाचारासाठीं येतां आलें नाहीं. तथापि अज राजा पत्नीविरहानें विषण्ण होऊन गेला आहे हें त्यांनीं अंतर्ज्ञानानेंच जाणलें व त्याचें सांत्वन करण्यासाठीं आपला एक शिष्य निरोप देऊन त्याच्याकडे पाठविला. तो अजाकडे येऊन त्यास म्हणाला—

" महाराज, आपली स्थिति गुरुजींना कळली नाहीं असें नाहीं. आपल्या सांत्वनार्थ ते स्वत:च यावयाचे, पण यज्ञविधि समाप्त न झाल्यामुळें तें काम त्यांनीं माझ्यावर सोंपविलें आहे. त्यांचा लहानसा पण अर्थपूर्ण संदेश मी आपणास निवेदन करितों; तो आपण कृपा करून ऐकावा व मनाचें समाधान करून घ्यावें अशी माझी विनंती आहे.

आमच्या महर्षींना ज्ञानचक्षूंच्या साह्यानें त्रैलोक्यांत होणाऱ्या यच्चयावत् गोष्टी कळून येतात. या प्रसंगीं त्यांना कळलेली गोष्ट अशी—

तृणबिंदु नांवाचा मुनि पूर्वीं एकदां घोर तपश्चर्या करीत असतां इंद्राला भीति वाटली. म्हणून त्याचा तपोभंग करावा या हेतूनें त्यानें हरिणीनामक अप्सरा त्याजकडे पाठविली. ती आली असतां आपल्या तपश्चरणांत हें विघ्न आलेलें पाहून तृणबिंदु क्रुद्ध झाला आणि त्यानें तिला 'तूं भूलोकीं मनुष्यस्त्री होऊन राहशील' असा शाप दिला. तेव्हां हरिणी घाबरून क्षमा मागूं लागली व म्हणाली, 'भगवन्, यांत माझा काय अपराध? स्वामीच्या आज्ञेवरून मजकडून हें कृत्य घडलें आहे; तरी उःशाप द्यावा.'

तिनें पश्चात्तापपूर्वक केलेली विनंती ऐकून मुनीला अनुकंपा आली व त्यानें तिला 'मृत्युलोकांतील तुझा वास दिव्य पुष्पांची माला दिसेपर्यंत राहील' असा उःशाप दिला. राजा, ती हरिणी नांवाची अप्सरा विदर्भ राजाच्या कुलांत जन्मास येऊन तुझी पट्टराणी झाली आणि शापनिवृत्तीचें ठरलेलें कारण घडतांच पुनरपि आपल्या लोकीं परत गेली आहे; तरी तिच्या मृत्यूबद्दल शोक करूं नको. प्राणिमात्रांच्या पाठीमागें मरण हें लागलेलेंच आहे.* 'जातस्य हि ध्रुवो मृत्युः.' अजा, वसुधा हीच राजे लोकांची खरी पत्नी होय.† आतां हिचें पालन करणें तुला अवश्य आहे. वैभवकाळीं आत्मसंयमन करून तूं मनाची जी धीरोदात्त वृत्ति प्रकट केलीस ती आपत्काळींहि प्रकट कर. तूं कितीहि शोक केलास, तरी मृत झालेली पत्नी तुला परत मिळेल काय?

---

* विपदुत्पत्तिमतामुपस्थिता ।

† वसुमत्या हि नृपाः कलत्रिणः ।

प्राणत्याग जरी तूं केलास तरी ती परत येणार नाहीं. कारण परलोकाला जाणाऱ्यांचे मार्ग आपापल्या कर्माप्रमाणें भिन्नभिन्न होत असतात.* त्यांच्या गांठी पडतीलच असें कोणीं सांगावें? आतां तूं दुःख गिळून टाक आणि पत्नीला पिंडोदक देऊन संतुष्ट कर. मृताबद्दल अश्रुमोचन करणें हें त्याला पीडाकारक होतें† हें तुला ठाऊक आहेना? खरें म्हटलें तर मरण हा प्राण्याचा स्वभावधर्म, आणि जीवित हीच त्याची विकृति म्हणजे त्यांतील एक प्रासंगिक गोष्ट होय.‡ देहधाऱ्याला क्षणभर जरी आयुष्य लाभलें तरी तो भाग्यवान समजावयाचा.§ जे मूढ असतात त्यांना मनुष्याचें मरण म्हणजे हृदयांत टोंचलेलें शल्यच वाटतें. पण जे धैर्यशाली पुरुष असतात त्यांना तेंच मरण म्हणजे हृदयांतून काढून टाकलेलें शल्य असें वाटतें. देहाचा आणि आत्म्याचा संयोग आणि वियोग हे तत्त्वतः ठरलेलेच आहेत. तर मग हे राजा, पुत्रमित्रकलत्रादिकांचा वियोग झाला असतां तुझ्यासारख्या सुज्ञाला दुःख कां व्हावें? अजा, तूं आपल्या इंद्रियांवर विजय मिळविला आहेस; यास्तव एकाद्या प्राकृत जनाप्रमाणें शोक करणें तुला युक्त नाहीं. पर्वत जर वाऱ्यानें वृक्षाप्रमाणें हलूं लागला, तर मग पर्वत व वृक्ष यांमध्यें भेद तो काय राहिला?"+

'ठीक आहे' असें म्हणून अजानें ज्ञानी वसिष्ठ गुरूंच्या यथोचित उपदेशाचा स्वीकार केला आणि त्यांच्या शिष्याला निरोप

---

* परलोकजुषां स्वकर्मभिर्गतयो भिन्नपथा हि देहिनाम् ।

† स्वजनाश्रु किलातिसंततं दहति प्रेतमिति प्रचक्षते ।

‡ मरणं प्रकृतिः शरीरिणां विकृतिर्जीवितमुच्यते बुधैः ।

§ क्षणमप्यवतिष्ठते श्वसन् यदि जन्तुर्ननु लाभवानसौ ।

+ द्रुमसानुमतां किमन्तरं यदि वायौ द्वितयेऽपि ते चलाः ।

'**रामचंद्र**' असें मंगलकारक नांव ठेविलें. या रघुवंशप्रदीपाच्या अप्रतिम तेजापुढें सूतिकागृहांतील दीप निस्तेज होऊन फिके दिसूं लागले!

कैकेयीला जो पुत्र झाला त्याचें नांव **भरत** असें ठेवण्यांत आलें. सुमित्रेला दोन जुळे मुलगे झाले. राजानें त्यांचीं नांवें **लक्ष्मण** व **शत्रुघ्न** अशीं ठेविलीं. सुमित्रेच्या कुमारांची ही जोडी म्हणजे सद्विद्येच्या पोटीं उत्पन्न होणारी प्रबोध व विनय यांचीच जणूं जोडी होती.

या चार बालकांच्या रूपानें प्रत्यक्ष पुरुषोत्तमच पृथ्वीवर अवतीर्ण झाल्यानें वसुधा धनधान्यानें समृद्ध होऊन स्वर्गहि विष्णूबरोबर भूलोकीं अवतरला! दाही दिशांना सुखकारक वारे वाहूं लागले. अग्नि धूमरहित झाला! सहस्ररश्मि पूर्ववत् तळपूं लागला! स्थावरजंगमांना हायसें वाटूं लागलें. असे सहस्रावधि शुभशकून अयोध्यापुरींत झाले, पण लंकापुरींत रावणाच्या मुकुटांतून मणी गळून पडूं लागले व राक्षसांची राज्यलक्ष्मी जणूं अश्रुबिंदूच गाळीत आहे असें वाटलें! अमरपुरींतील देव दशरथापेक्षां अधिकच प्रमुदित होऊन त्यांनीं दुंदुभि वाजवीत त्याच्या वाड्यावर कल्पवृक्षांच्या कुसुमांचा वर्षाव केला. रामचंद्रप्रभृति चार कुमारांवर पुढें होणाऱ्या जातकर्मादि संस्कारांचा देवांनींच प्रारंभ केला म्हणावयाचा!

क्रमाक्रमानें त्यांचे संस्कार होऊन त्यांना योग्य तें सर्वांगीण शिक्षण देण्यांत आलें. तेव्हां अग्नीचें सहज तेज हविर्भागांनीं जसें प्रज्वलित होतें, तसा कुमारांचा स्वाभाविक विनयशीलपणा शिक्षणानें अधिकच वृद्धि पावला व त्यांचें नैसर्गिक सौजन्य अधिक खुलून दिसूं लागलें.

या चौघां भावांमध्यें सामान्यतः चांगलें प्रेम वसत होतें. तरी त्यांतल्या-त्यांतहि राम व लक्ष्मण यांचें आणि भरत व शत्रुघ्न यांचें परस्पर प्रेम विशेषच असल्यामुळें त्यांच्या जोड्या बनून राहिल्या. त्यांत कधींच फूट दिसली

नाहीं. अग्नि व वायु किंवा समुद्र व चंद्र यांच्याचसारखें त्यांचें नित्य साहचर्य असे. त्यांनीं आपल्या अंगच्या अलौकिक गुणांनीं प्रजेचें मन आकर्षून घेतलें. दशरथाचे हे चार पुत्र म्हणजे धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष यांचे मूर्तिमंत अवतारच होत असें लोक म्हणत. चतुर्भुज विष्णूप्रमाणें दशरथहि आपल्या चार पुत्रांच्या योगानें विशेष शोभूं लागला !

---

# कथा सोळावी

## विश्वामित्राचा यज्ञ.



राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न यांचें बालपणचें शिक्षण चाललें असतां, एके दिवशीं विश्वामित्र मुनि अकस्मात् दशरथाच्या सभेंत येऊन उभा राहिला व म्हणाला—"राजा, माझ्या यज्ञास राक्षस विघ्न करीत आहेत, तरी त्याच्या रक्षणार्थ रामाला माझ्याबरोबर पाठीव." त्यावेळीं राम पाहिला तर केवळ बाल असून त्याच्या कानांवर झुलपें अद्याप लोंबत होतीं. पण त्याला मागण्यांत विश्वामित्राला कांहींच वावगें वाटलें नाहीं, कारण तेज हें वयावर अवलंबून नसतें* ही गोष्ट त्यास अवगत होती.

विश्वामित्राची मागणी ऐकून दशरथास कसेंसेंच वाटलें. नवससायासांनीं झालेल्या पुत्राला इतक्या अल्पवयांत दूर कसें पाठवावें असेंहि क्षणभर त्याच्या मनांत आलें. तथापि आलेला याचक प्राण मागत असला तरी तेंहि द्यावयाचे, पण त्याला विमुख पाठवावयाचें नाहीं हें रघुकुलांतील राजांचें व्रत होतें, तें राखण्यासाठीं रामाला लक्ष्मणासह मखरक्षणासाठीं धाडण्याचें त्यानें ठरविलें.

मग पुत्रांच्या प्रयाणानिमित्त राजानें नगरांतील राजमार्ग शृंगारण्याची आज्ञा केली; तोंच मेघांनीं वर्षाव करून राजपथ शिंपून टाकिले व वाऱ्यानें त्यांना साहाय्य करून त्यांवर पुष्पवृष्टि केली. रामलक्ष्मण पित्याच्या आज्ञेप्रमाणें वागण्यास एका पायावर सिद्ध होते. ते धनुष्यबाण घेऊन निघतांना पित्याच्या पायां पडले, तेव्हां त्यांना निरोप देतांना दशरथाच्या

---

* तेजसां हि न वयः समीक्ष्यते ।

नेत्रांत अश्रु आले. मग आपल्या मातुःश्रींना वंदन करून ते मार्गस्थ झाले.

विश्वामित्र पुढें चालूं लागला. त्यांच्या मागून रामलक्ष्मण निघाले. मार्गांत दोन्ही बाजूंना पौरजनांनीं त्यांना पाहाण्यासाठीं उभें राहून जणूं काय डोळ्यांचीं तोरणें त्यांच्यावर उभारलीं. विश्वामित्राला रामलक्ष्मणाव्यतिरिक्त दुसऱ्या कोणाचीच अवश्यकता नव्हती. अर्थात् त्यांच्या रक्षणासाठीं सैन्य न देतां त्या कामीं केवळ आशीर्वादाचीच दशरथानें योजना केली. तोच त्या कामीं पुरेसा होता.

थोड्याच वेळानें ते सरयूनदीच्या कांठीं येऊन पोंचले. तेथें विश्वामित्रानें त्यांना ‘बला’ व ‘अतिबला’ या विद्यांचा उपदेश केला. चालावयाचेंच झालें तर राजवाड्यांतील भूमींवर चार पावलें टाकावयाचीं, नाहीं तर नित्य रथगजादि वाहनांतून फिरावयाचें, अशी ज्यांची राहणी, त्या राजकुमारांना मार्ग चालतांना या विद्यांच्या योगानें कांहींच श्रम वाटले नाहींत. तसेंच त्यांच्या मनोविनोदनार्थ विश्वामित्र त्यांच्या पूर्वजांच्या मनोवेधक कथा सांगत असतां, त्या श्रवण करण्यांत ते इतके गर्क होऊन जात कीं, आपण पायीं चालत नसून वाहनांतूनच जात आहों असें त्यांस भासे. वाटेंत त्यांची सेवा करण्यास मधुर जलानें भरलेलीं सरोवरें, श्रुतिमनोहर गायन करणारे विहंगम, पुष्पांतील सुगंध वाहून नेणारा वायु, आणि वरून छाया पाडणारे मेघ हीं नित्य सिद्ध असत.

जातां जातां मदनाचा आश्रम ओलांडल्यावर ताडकेची भयंकर आरोळी त्यांच्या कानावर पडली. ती ऐकतांच रामलक्ष्मणांनीं आपापल्या चापांवर दोरी चढविली आणि तिचा मोठ्यानें टणत्कार केला. तो ऐकतांच कालिकामूर्तीप्रमाणें भयंकर स्वरूप धारण केलेली काळीकुट्ट ताडका

राक्षसी त्यांच्याकडे येऊं लागली. तिच्या भयंकर वेगामुळें मार्गावर वारा सुटून झाडें हलूं लागलीं. तिनें प्रेतांच्या अंगावरील वस्त्रें धारण केलीं होतीं. तिच्या कमरेभोंवतीं गुंडाळलेलीं माणसाचीं आंतडीं खालीं लोंबत होतीं. तिचा स्वर अत्यंत कर्कश होता. तिनें रामावर चाल करितांच त्यानें चटकन् तिच्यावर बाण सोडला. ही स्त्री झाली तरी क्रूर आहे म्हणून तिच्याविषयींची दयासुद्धां त्यानें बाणाबरोबरच सोडून दिली !

रामाच्या अमोघ बाणानें ताडकेच्या वक्षःस्थलावर छिद्र पडलें. हें छिद्र म्हणजे राक्षसांच्या प्रांतांत शिरण्यासाठीं मृत्यूला करून दिलेलें जणूं द्वारच झालें ! तिच्या हृदयाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडून ती धाडकन भूमीवर आदळली. त्यासरसा तो सर्व प्रदेश हादरला; इतकेंच नव्हे तर दूर अंतरावर असलेल्या रावणाच्या राज्यश्रीलाहि कांपरें भरलें ! रामचंद्राची अचूक शरसंधान करण्याची शैली व प्रसंगावधान हीं पाहून विश्वामित्रास पराकाष्ठेचा संतोष वाटला व त्यानें त्याच्या धैर्याची व पराक्रमाची प्रशंसा करून त्यास विविध अस्त्रविद्या दिल्या.

यानंतर ते वामनाच्या आश्रमाशीं आले. वामनावतारांतलें आपलें स्वतःचें वृत्त रामाला यावेळीं स्मरत नव्हतें तथापि अस्पष्ट संस्कारामुळें त्याला उत्सुकता वाटल्याशिवाय मात्र राहिली नाहीं. मग थोडक्याच अवधींत ते विश्वामित्राच्या पुण्य व रमणीय सिद्धाश्रमापाशीं आले. तेथें शिष्यवृंद त्यांचें स्वागत करण्यास सिद्ध होता. त्यांनीं यथोचित सत्कार केल्यावर त्याच दिवशीं विश्वामित्रानें यथाविधि यज्ञदीक्षा घेतली आणि रामलक्ष्मण चंद्रसूर्याप्रमाणें संनद्ध होऊन रात्रंदिवस यज्ञरक्षण करूं लागले.

यज्ञसत्र चालू झाल्यावर अल्पावधींतच वेदीवर रक्तबिंदु पडूं लागले. तेव्हां ऋत्विजांची कोण घाबरगुंडी उडाली ! हातांतील होमपात्रें टाकून

देऊन ते इतस्ततः पळूं लागले. हें काय म्हणून रामचंद्रानें वर पाहिलें तों असुरांचें सैन्य ध्वज फडकावीत अंतरिक्षांत घिरट्या घालीत आहे असें त्यास दिसलें. लगेच त्यानें भात्यांत हात घालून बाण काढला आणि अध्वराचा विध्वंस करण्यास आलेले दैत्यांचे दोन नायक तेवढे ओळखून त्यांच्यावर नेमका बाण सोडला. त्याला इतरांकडे लक्ष्य देण्याचें काय प्रयोजन ? खगराज गरुड झाला, तरी तो निर्विष अशा विरोळ्यावर आपला प्रभाव न दाखवितां भयंकर अशा विषारी सर्पावरच दाखवितो.*

मग वाय्वास्त्रासह सोडलेला तो शर लागतांच पर्वततुल्य शरीर असलेला ताडकातनय मारीच जीर्णपर्णाप्रमाणें गळून पडला ! आणि गुप्तपणें संचार करणाऱ्या सुबाहूची पण तीच गत झाली.

याप्रमाणें विश्वामित्राच्या यज्ञामध्यें आलेलें विघ्न या दोघां दशरथ-पुत्रांनीं सहज लीलेनें नाहींसें केलें; तेव्हां ऋत्विजांनीं त्यांच्या कौशल्याची वाखाणणी करून तो यज्ञ यथासांग पुरा केला. मग अवभृतस्नान आटोपल्यावर रामलक्ष्मण विश्वामित्राला वंदन करावयास गेले तेव्हां त्याला मोठा संतोष झाला. त्यानें उभयतांना आशीर्वाद दिले आणि आपला पवित्र हस्त त्यांच्या मस्तकावर ठेविला.

---

* किं महोरगविसर्पिविक्रमो राजिलेषु गरुडः प्रवर्तते ।

# कथा सतरावी

## धनुर्भंग आणि लग्नसोहळा

याच सुमारास मिथिला देशाच्या जनक राजानें यज्ञ आरंभिला व तन्निमित्त विश्वामित्र ऋषीस निमंत्रण दिलें. जनकाजवळ असलेलें धनुष्य पाहाण्याविषयीं रामलक्ष्मणाच्या मनांत कुतूहल उत्पन्न झालें होतें; म्हणून तिकडे निघतांना ऋषींनीं त्यांसहि समागमें घेतलें. मार्गांत त्यांना गौतमाचा आश्रम लागला. तेथें गौतमवधू अहल्या शिला होऊन पडली होती. तिच्या पातकांचा नाश करणाऱ्या रामाच्या पायांचा तिला स्पर्श होतांच तिला पूर्वीचें सुंदर स्वरूप प्राप्त झालें.

इकडे रामलक्ष्मणांसह विश्वामित्र येत असल्याची वार्ता जनकास अगोदरच लागली होती. म्हणून तो त्यांना सामोरा गेला व मोठ्या गौरवानें त्यांना यज्ञमंडपांत घेऊन आला. विदेहनगरींतील लोकांना रामलक्ष्मणांस पाहून आकाशांतील पुनर्वसूचे दोन्ही तारेच पृथ्वीवर आले आहेत कीं काय असें वाटलें. त्यांच्याकडे कितीहि पाहिलें तरी त्यांच्या नेत्रांचें समाधान होईना.

पुढें यथाकाळीं यज्ञसमाप्ति झाल्यावर विश्वामित्रानें उचित प्रसंग पाहून त्या वीरपोतांना जनकाकडे नेलें व या कुमारांना शिवधनु बघण्याची मोठी उत्कंठा आहे असें सांगितलें. रामचंद्राचा सुकुमार देह पाहून राजाला वाटलें कीं, ' अरेरे, कन्येसाठीं शिवधनुर्भंगाचा दुष्कर पण मी उगाच मांडला.' तो विश्वामित्रास म्हणाला—'मुनिराज, मोठमोठ्या मत्त हत्तींनाहि जी गोष्ट दुरापास्त आहे ती लहानशा छाव्याला कशी करतां येणार ?

ह्मणून यांना त्या धनुष्यास हात लावूं देण्यास माझें मन धजत नाहीं. महर्षे, मी मी म्हणणाऱ्या धनुर्धरांना या धनुष्यानें फजित केलें आहे. हें धनुष्य पेलतां न आल्यानें कित्येक वीर ' धिक्कार असो आमच्या बाहूंना ' असें म्हणत लज्जेनें खालीं माना घालून, आले तसे हात हलवीत जळफळत परत गेले आहेत. '

या बोलण्यानें विश्वामित्राचें मुळींच समाधान झालें नाहीं. ' रामाचें सामर्थ्य विलक्षण आहे; त्याचें नुसतें वर्णन मी कशास करूं ? पर्वतावरच वज्राचा प्रभाव समजून येतो; तद्वत् रामाच्या अद्भुत शक्तीचें प्रत्यंतर प्रत्यक्ष धनुष्यावर पाहावयास मिळेल ' एवढेंच त्यानें उत्तर दिलें. तें ऐकून जनकाला रामाविषयीं विश्वास उत्पन्न झाला आणि लगेच त्यानें शिवचाप घेऊन येण्याची सेवकांस आज्ञा केली. तदनुसार सेवकांनीं सर्व व्यवस्था केल्यावर, सुप्त अशा भीषण सर्पासारखें तें प्रचंड धनुष्य रामानें उचललें ! तेव्हां सर्व सभा विस्मयानें थक्क होऊन गेली असतां, पर्वतासारख्या जड अशा त्या धनुष्यावर—मदनानें पुष्पचाप सज्ज करावा तद्वतच—दोरी चढविली. पण काय चमत्कार ! दोरी चढविण्यासाठीं तें धनुष्य लीलेनें वाकवीत असतां, थोडें अधिकच वाकविल्यामुळें तें कडाडून मोडलें आणि त्याचा वज्राघातासारखा कठोर ध्वनि थेट परशुरामाच्या कानावर जाऊन आदळला, व त्यानें ' क्षत्रियांचा पुनश्च उदय झाला ' ही वार्ताच जणूं त्यास कळविली !

रामचंद्राचें अद्वितीय बल व चातुर्य पाहून असा तेजस्वी व रूपवान जामाता आपणास मिळाल्याबद्दल जनकाला जो आनंद झाला तो कोठवर वर्णावा ? आपला पण खरा करण्यासाठीं त्यानें विश्वामित्ररूपी अग्नि साक्षी ठेवून लक्ष्मीसारखी आपली कन्या रामास देण्याचें ठरविलें; आणि दशरथाला विवाहसमारंभास आणण्यासाठीं, पुरोहिताबरोबर ' आमच्या

कन्येस आपली सून करून घेऊन निमीच्या कुलाला कृतार्थ करावें' असा निरोप देऊन त्याच्याकडे पाठविलें.

इकडे दशरथ राजाहि यावेळीं आपल्या कुलाला अनुरूप अशा स्नुषांच्या शोधांत होता. इतक्यांत तीच सुवार्ता घेऊन जनकाचा उपाध्याय त्याच्याकडे आला. हें योग्यच झालें; कारण पुण्यवान पुरुषांचे मनोरथ कल्पवृक्षाप्रमाणें तत्काळ फलद्रूप होतात !*

वरीलप्रकारचा संदेश श्रवण करतांच दशरथ इष्टमित्रांस घेऊन थाटा-माटानें ससैन्य मिथिलेस निघाला. तेथें तो गेल्यावर उभय राजांनीं एकाच सुमुहूर्तावर आपापल्या वैभवाला शोभेल अशा तऱ्हेनें चारी मुलांमुलींचे विवाहसमारंभ साजरे केले. जनकानें पृथ्वीची कन्या सीता हिचा हात रघुकुलतिलक राम याच्या हातांत दिला. त्याची दुसरी कन्या उर्मिळा इचें लक्ष्मणानें पाणिग्रहण केलें. तसेंच जनकाचा धाकटा भाऊ कुशध्वज याच्या उपवर कन्या मांडवी व श्रुतकीर्ति यांच्याशीं अनुक्रमें भरत व शत्रुघ्न यांचे विवाह झाले.

---

* सद्य एव सुकृतां हि पच्यते कल्पवृक्षफलधर्मि काङ्क्षितम् ।

पुत्रासंबंधानें तो दशरथाला जितका प्रिय होता तितकाच परशुरामासंबंधानें दारुण वाटला ! हार व सर्प या दोहोंतहि रत्न असलें तरी एक जितकें स्पृहणीय वाटतें तितकेंच दुसरें वर्जनीय वाटतें !

दशरथ लगेच भार्गवाला शांत करण्याच्या मार्गाला लागला. 'अहो अर्घ्य आणा, अहो अर्घ्य आणा' असें तो सेवकांना सांगूं लागला. पण जामदग्न्यानें तिकडे लक्ष्य न देतां, धनुष्य घट्ट मुठींत धरून जिकडे राम होता तिकडे आपली उग्र दृष्टि वळविली. त्याच्या नेत्रांतून रोपाग्नीच्या ज्वाळा निघत होत्या ! परंतु राम निर्भयपणें त्याच्यापुढें येऊन उभा ठाकला आणि बाण बोटांत धरून खेळवूं लागला.

तेव्हां परशुराम म्हणाला, 'हे दशरथपुत्रा, तुम्ही क्षत्रिय म्हणजे माझे वैरी आहां. अनेकवार क्षत्रियांचा वध करून मी आपला कोप तात्पुरता शांत केला आहे. पण निजलेला सर्प काठीनें डवचावा त्याप्रमाणें शिवचापाचा भंग करून तूं माझा राग अधिकच उद्दीपित केला आहेस. तूं हें धनुष्य मोडलें नाहींस तर धनुष्यरूप माझें वीर्यशृंगच भग्न केलें आहेस. आजवर 'राम' म्हटलें म्हणजे माझाच बोध होत होता. पण आतां तूं पुढें आल्यामुळें मला त्या नांवाची लाज वाटूं लागली आहे. माझें अस्त्र पर्वतावरहि कुंठित न होणारें असें आहे. तथापि मला आतां दोन सारखेच शत्रु झाले. पूर्वी धेनुहरण करून कार्तवीर्यानें जसा माझा अपराध केला, तसाच अपराध माझ्या कीर्तीचा अपहार करून तूं आज केला आहेस; यास्तव तुला जिंकलें नाहीं तोंवर 'क्षत्रियसंहारकर्ता' या पदवीला मी लायक कसा होईन ? जो सुक्या गवताला जाळतो तसाच सागरामध्येंहि जो जळूं शकतो तोच खरा वडवानल. तुला वाटत असेल कीं, शिव-धनुष्य भंगून मी अचाट पराक्रम केला; पण शंकरानेंच त्यांतील तेज हरण करून तें निःसत्व करून टाकलें होतें; त्यांत तुझा पुरुषार्थ तो काय ? नदीच्या

वेगानें ज्याचीं पाळेंमुळें खणून टाकिलीं आहेत अशा वृक्षाला मंद वाहणारा वायुदेखील सहजीं उमळून टाकतो.* रामा, तुझ्यांत खरेंखुरें वीरत्व असेल तर हें घे माझें धनुष्य आणि ही दोरी चढवून बाण लाव. तूं एवढें केलेंस तरीहि माझ्या बरोबरीच्या वीरानें माझा पराभव केला असें मी म्हणेन. मग प्रत्यक्ष युद्धाचीच कांहीं आवश्यकता नाहीं. आणि या तीक्ष्ण धारेच्या परशूची तुला भीति वाटत असेल तर अभययाचनेसाठीं माझ्यासमोर हात जोडून उभा राहा."

मोठा आव आणून केलेलें हें भार्गवाचें भाषण ऐकून रामानें स्मितमात्र केलें आणि त्याला उत्तर म्हणून त्याच्या धनुष्यालाच हात घातला. रामाच्या हाताचा परशुरामाच्या धनुष्याला स्पर्श होतांच रामाला अद्भुत तेज चढलें व त्याच क्षणीं धूमशेष झालेल्या अग्नीप्रमाणें परशुराम गतप्रभ झाला ! तेव्हां त्याच्याविषयीं रामाला अनुकंपा उत्पन्न झाली व धनुष्यावर लावलेल्या त्या अमोघ बाणाचें आतां काय करावें असा विचार करीत तो भार्गवास म्हणाला—

'भार्गवा, तूं ब्राह्मण असल्यामुळें तुझ्यावर प्रहार करणें माझ्यानें होणार नाहीं. तेव्हां या शरानें तुझी गति कुंठित करूं, का यज्ञानुष्ठानानें तूं प्राप्त करून घेतलेलें स्वर्गप्राप्तिरूप फल नष्ट करूं? सांग. रामाचा बाण व्यर्थ जाणारा नाहीं.'

परशुरामानें उत्तर केलें—' रामा तूं पुरातन पुरुष आहेस हें का मीं ओळखिलें नाहीं? पृथ्वीवर अवतरलेल्या तुझें वैष्णव तेज पाहण्यासाठींच केवळ मी तुला चेतविलें. माझ्या पित्याच्या वैऱ्यांना भस्मसात् करून व संपूर्ण पृथ्वीचें दान करून मीहि पराक्रम गाजविला आहे.

* खातमूलमनिलो नदीरयैः पातयत्यपि मृदुस्तटद्रुमम् ।

तरीहि परमेश्वरासारख्या अशा तुझ्याकडून झालेला माझा पराभव मला अत्यंत श्लाघ्य वाटतो. तेव्हां आतां असें कर कीं, मला तीर्थाटण करावयाचें असल्यामुळें माझी गति मात्र कुंठित करूं नको; ती पूर्ववत् अनिरुद्ध असूं दे. मी भोगलोलुप नसल्यामुळें माझें स्वर्गफल खुशाल नष्ट कर.' 'ठीक आहे' असें म्हणून रामानें बाण सोडला आणि परशुरामाचें सुकृत जरी मोठें होतें तरी त्याचा स्वर्गमार्ग बंद केला. मग त्यानें परशुरामाचे पाय धरले आणि त्याची क्षमा मागितली. प्रतिपक्ष्याला पाणी पाजल्यावरहि त्याच्याशीं लीनतेनें वागणें हें पराक्रमी पुरुषाला अपमानास्पद नसून भूषणास्पदच होय !*

रामचंद्राचा हा नम्रपणा पाहून तो तपोनिधि म्हणाला, "माझें मातृवंशापासून प्राप्त झालेलें क्षात्रतेज नष्ट करून पितृदत्त शांति तूं मला प्राप्त करून दिलीस यांत तुजकडून माझा अपकार न होतां माझ्यावर मोठा उपकारच झाला आहे यांत शंका नाहीं. आतां मी जातों. तूं जें देवकार्य करण्यासाठीं अवतरला आहेस तें तुझ्या हातून निर्विघ्नपणें पार पडो." असें म्हणून तो निघून गेला.

परशुराम निघून गेला व राम विजयी झाला हें पाहून रामाचा पुनर्जन्मच झाला असें पुत्रवात्सल्यामुळें दशरथास वाटलें आणि त्यानें रामाला कडकडून आलिंगन दिलें. त्याला वाटलेल्या क्षणिक भीतीनंतर झालेला हा आनंद म्हणजे वणव्याच्या ज्वाळेंत क्षणमात्र सांपडलेल्या झाडावर झालेला जलवर्षावच होता.

ह्याप्रमाणें आकस्मिक आलेल्या क्षणिक संकटाचा परिहार झाला व थोड्या दिवसांनीं दशरथ आपल्या परिवारासह अयोध्येला आला. नववधूंचा नगर-

---

* निर्जितेषु तरसा तरस्विनां शत्रुषु प्रणतिरेव कीर्तये ।

प्रवेश पाहण्यासाठीं सारे लोक उत्कंठित झाले होते व दुतर्फा घरांच्या खिडक्या त्यांत बसलेल्या स्त्रियांच्या नेत्रांमुळें कमळांनीं भरून गेल्यासारख्या दिसल्या !

---

# कथा अठरावी

## राज्याभिषेक कीं वनवास !



चारहि पुत्रांचे अनुरूप वधूंशीं विवाह होऊन तीं वधूवरें आनंदानें व सुखानें नांदूं लागलेलीं पाहून दशरथाला व कौसल्यादि त्याच्या पत्नींना कृतार्थता वाटली. याप्रमाणें कित्येक वर्षें लोटल्यावर दशरथाचा वृद्धापकाळ झाला. त्याची आयुर्ज्योति उषःकालीन दीपज्योतीप्रमाणें निष्प्रभ दिसूं लागली. तिच्यांतील तेलहि संपत आलें व आतां लवकरच टोंकापर्यंत येऊन ती विझणार असें सर्वांस वाटूं लागलें. दशरथाचे केस पांढरे झाले तेव्हां असें वाटलें कीं, जणूं 'जराच' त्याच्या कानाशीं लागून, कैकेयीची भीति नाहींशी करण्यासाठीं रामाला राज्याभिषेक कर असें गुणगुणूं लागली !

राजानें रामराज्याभिषेकाचा दिवस ठरविला; ही वार्ता हां हां म्हणतां सर्वतोमुखीं होऊन कालव्याच्या उदकानें उद्यानवृक्ष प्रफुल्लित दिसावे त्याप्रमाणें पौरजनांचीं अंतःकरणें प्रफुल्लित झालीं.

तो सोन्याचा दिवस उगवला ! अभिषेकाची सर्व सामग्री सिद्ध झाली. पण तींत क्रूर कैकेयीनें बिघाड करून दशरथाच्या नेत्रांतून शोकाश्रु वाहविले. तेव्हां तिची समजूत घालण्याकरितां पूर्वीं वचन दिल्याप्रमाणें राजा दोन वर देण्यास सिद्ध झाला. त्यावेळीं 'तुझ्या मनांत जें असेल तें सांग' असें राजानें म्हणतांच, पाऊस पडल्यावर भूमीच्या विवरांतून सर्प बाहेर पडावें तद्वत् तिच्या मुखांतून त्या वरांचा उच्चार झाला ! तिनें एका वरानें रामचंद्रास चौदा वर्षें वनवासास पाठविलें, व दुसऱ्या वरानें भरताचा राज्याभिषेक मागून घेतला !

आपणांस यौवराज्याभिषेक होणार हें वर्तमान ऐकून रामास आनंद झाला नव्हता; वडील विद्यमान असतां आपण कसें सिंहासनारूढ व्हावें या जाणिवेनें त्याच्या नेत्रांत दुःखाश्रु आले होते. पण ' वनवासास जा ' अशी मागाहून झालेली पित्याची आज्ञा त्यानें आनंदानें स्वीकारली. राज्याभिषेकप्रसंगींचीं मंगल रेशमीवस्त्रें व वनवास स्वीकारतेवेळचीं वल्कलें धारण करतांना त्याचें मुख सारखेंच संतोषवृत्तीचें पाहून लोकांना मोठा विस्मय वाटला.

त्यानंतर पित्याला असत्याचा डाग लागूं नये म्हणून रामानें सीता व लक्ष्मण यांसह दण्डकारण्यांत पाऊल टाकिलें. तेव्हां सज्जनांच्या अंतःकरणांतहि त्याला स्थान मिळालें. इकडे रामवियोगानें दशरथ शोकार्त झाला तेव्हां आपल्याच कर्मामुळें प्राप्त झालेला शाप त्याला आठवला. आणि शरीरत्याग हाच एक शापमुक्तीचा उपाय होय असें त्याच्या मनानें घेतलें. तदनुसार ' राम ' ' राम ' असे शब्द तोंडानें उच्चारीत त्यानें प्राण सोडला.

दशरथाचा अंत झाल्यावर अयोध्येंत कोणी राजकुमार नाहीं असा प्रसंग साधून, संधीची वाट पाहात बसलेल्या शत्रूंनीं उचल केली. तेव्हां अमात्यांनीं शोक आवरून आपल्या मातुलगृहीं असलेल्या भरताला बोलावून घेतलें.

थोड्याच अवधींत, भरत अयोध्येस आल्यावर जेव्हां त्याला पित्याच्या मृत्यूचा प्रकार कळला तेव्हां त्याला आईचाच नव्हे पण राज्याचाहि तिट्कारा आला. तो लगेच सैन्य घेऊन वनवासी लोकांना वाट पुशीत पुशीत रामाचा शोध करीत तिकडे गेला.

पुढें चित्रकूट पर्वताच्या वनांत रामचंद्राची गांठ पडल्यावर भरतानें त्याला वडिलांची निधनवार्ता सांगून राज्य करण्यासाठीं परत येण्याची

विनंती केली. ज्येष्ठ बंधु विद्यमान असतां त्याच्यापूर्वी राज्यलक्ष्मीचा स्वीकार करणें म्हणजे परिवेत्ता[1] होण्याचें पाप करणें होय असेंहि तो म्हणाला; पण कांहीं केल्या स्वर्गस्थ पित्याच्या वचनापासून रामाला निवृत्त करणें अशक्य आहे हें पाहून शेवटीं राज्याची अधिदेवता म्हणून त्याच्यापासून त्याच्या पादुका भरतानें मागून घेतल्या.

तेथून रामाची आज्ञा घेऊन भरत जो परत आला तो अयोध्येंत शिरलाच नाहीं; तर बाहेर नंदिग्रामांत राहून राज्य म्हणजे रामाची ठेव होय असें मानून कारभार करूं लागला.

अशा प्रकारची रामाविषयींची भरताची भक्ति असल्यामुळें आलेली राज्यलक्ष्मी लाथाडून तो जणूं काय मातेच्या पापांचें क्षालन करूं लागला.

---

१ परिवेत्ता—राज्य घेणारा कनिष्ठ बंधु.

# कथा एकोणिसावी
## सोन्याचा हरिण



इक्ष्वाकुवंशांतील राजे वार्धक्यांत ज्या व्रताचें आचरण करीत तें व्रत कंदमूलांचें भक्षण करून राम यौवनांतच आचरूं लागला. चित्रकूटावर कांहीं दिवस राहिल्यावर रामाला अशी भीति वाटली कीं, नंदिग्रामापासून आपण समीप असल्यानें भरत पुनः कदाचित् आग्रह करावयास येईल. म्हणून चित्रकूट सोडून तो पुढें दक्षिणेस जनस्थानाकडे गेला. सीता राजलक्ष्मीप्रमाणें पाठीमागून चालूं लागली. प्रथम त्यास वाटेंत अत्रि ऋषींचा आश्रम लागला. तेथें अत्रिपत्नी अनसूया इनें पवित्र सुगंध असलेली एक दिव्य उटी सीतेच्या अंगाला लाविली. त्यायोगें सर्व कानन सुगंधमय होऊन गेलें. भ्रमरवृंद इतर पुष्पें सोडून त्या उटीवरच लुब्ध होऊन जात.

याप्रमाणें निरनिराळ्या ऋषींचे आदरसत्कार व आशीर्वाद घेत घेत राम वनांतून चालला असतां, राहूनें चंद्राचा मार्ग अडवावा त्याप्रमाणें विराधनामक कृष्णवर्ण राक्षसानें त्याचा मार्ग अडविला. राम व लक्ष्मण यांच्यामध्यें असलेल्या सीतेला त्यानें अचानक उचलून घेतलें. रामलक्ष्मणांनीं तत्काळ त्यास ठार करून त्याच्या शवाची चोहोंकडे दुर्गंधी पसरूं नये म्हणून तें एका खड्ड्यांत पुरून टाकिलें.

तेथून पुढें राम गोदातीरीं पंचवटीस आला व अगस्तींच्या आज्ञेनें तेथेंच पर्णकुटी बांधून राहिला. विंध्य पर्वत ज्याप्रमाणें अगस्तींच्या उपदेशानुसार वागला, त्याप्रमाणें रामानेंहि अगस्तींची आज्ञा शिरसावंद्य मानिली.

पंचवटींत असतां कर्मधर्मसंयोगानें रावणाची धाकटी बहीण शूर्पणखा तेथें आली. रामाची सुश्लिष्ट शरीरयष्टि व मदनासारखें सुंदर रूप पाहून ती राक्षसी मोहित झाली व आपणांशीं लग्न करण्याबद्दल तिनें सीतेसमक्ष रामाजवळ गोष्ट काढिली. तेव्हां राम शांतपणें व किंचित् थट्टेनें म्हणाला, माझें लग्न झालेलें आहे, माझा धाकटा भाऊ लक्ष्मण याला तूं माळ घाल. रामाच्या सांगण्याप्रमाणें शूर्पणखा लक्ष्मणाकडे गेली आणि त्याच्याशीं प्रेमयाचना करूं लागली. तेव्हां लक्ष्मण तिला म्हणाला, ज्येष्ठ भ्रात्याकडे जाऊन प्रणययाचना केल्यावर तूं मजकडे आली आहेस म्हणून तुझा मला स्वीकार करतां येत नाहीं.

अशा रीतीनें लक्ष्मणानें धुडकावून लावल्यावर दोन्ही डगरींवर हात ठेवणारी ती राक्षसी पुनश्च रामाकडे आली. वरकरणी तिनें मोठें शांत-स्वरूप धारण केलें होतें; पण तिची अशी 'जा ये' पाहून सीतेला हंसूं कोसळलें. तें तिचें हंसणें पाहून राक्षसीनें शूर्पणखा नांवाला शोभणारें खरें रूप प्रकट केलें; आणि 'थांब माणसाचे पोरी, माझी अशी थट्टा करितेस काय? हें घे प्रायश्चित्त; व्याघ्रीला डवचणाऱ्या हरिणीचें काय होतें हें तुला दाखवितेंच पाहा!' असें म्हणून रामाच्या आड लपूं पाहाणाऱ्या सीतेला बोचकारण्यासाठीं ती ओढूं लागली. तो प्रकार पाहून, प्रथम कोकिळेप्रमाणें गोड बोलणारी ही बया खरोखरीची भयानक राक्षसी आहे असें लक्ष्मणाला कळून आलें. तेव्हां तिला शिक्षा करण्यासाठीं आपलें खड्ग घेऊन तो तिच्यासह पर्णशाळेंत गेला आणि आधींच भीषण असलेलें तिचें स्वरूप तिचें नाक कान छाटून त्यानें अधिकच भीषण केलें. तेव्हां ती मोठाल्या किंकाळ्या फोडीत आकाशांत उडाली व राम लक्ष्मण सीता यांच्याकडे हातवारे करून त्यांची निर्भर्त्सना करीत त्यांना धमकी देऊं लागली. तेथून तिनें जनस्थानांत जाऊन आपल्या खरप्रभृति भावांना रामानें केलेला प्रकार

पाठविलें. तेथें जाऊन मारीचानें रामाला फसवून दूर नेलें आणि त्या संधींत रावण स्वतः सीतेला घेऊन पळून गेला! वाटेंत त्याला कोणीं क्षणमात्र अडविलें असेल तर तें एकट्या गृध्रराज जटायूनेंच.

---

# कथा विसावी

## सीताशोध व रावणवध



इकडे पर्णकुटींत परत आल्यावर रामलक्ष्मण सीतेच्या शोधार्थ निघाले. फिरतां, फिरतां, मरावयास टेकलेला जटायू त्यांच्या दृष्टीस पडला. त्याचे पंख छाटलेले होते. त्यानें दशरथाच्या स्नेहऋणाची फेड आपले प्राण अर्पून केली होती. मरतां मरतां त्यानें सीतेला रावणानें पळवून नेल्याचें रामलक्ष्मणांस सांगितलें; तसेंच तिला सोडविण्यासाठीं आपण कसे झगडलों हें त्यानें आपल्या तुटलेल्या पंखांनींच दाखवून दिलें.

जटायू मृत झालेला पाहून रामलक्ष्मणांना जणूं कांहीं दशरथाच्या मरणाचा शोक पुनः झाला. त्यांनीं जटायूचा पित्यास उचित असा अग्नि-संस्कार करून त्याची उत्तरक्रियाहि केली.

त्यानंतर ते पुढें वाट चालूं लागले. मार्गांत कबंध राक्षसाची गांठ पडली असतां त्याचा वध करून रामानें त्यास शापमुक्त केलें, आणि त्याच्या सांगण्यावरून सुग्रीव नामक वानराशीं सख्य जोडलें. सुग्रीव आपल्या-सारखाच आपद्ग्रस्त आहे असें कळल्यावर रामानें त्याचा प्रतिस्पर्धी जो वाली त्याचा वध करून सुग्रीवाची त्याच्या राज्यावर स्थापना केली.

मग रामचंद्राचें उतराई व्हावें म्हणून सुग्रीवानें त्याच्या पत्नीचा शोध लावण्याकरितां चारी दिशांस वानरांच्या टोळ्या पाठवून दिल्या. रामाचे चालते बोलते मनोरथच असे ते शाखामृग वैदेहीच्या शोधार्थ हिंडत असतां, जटायूचा भ्राता संपाती याची भेट होऊन त्याच्याकडून त्यांना सीतेचें ठावठिकाण समजलें.

संपातीनें दिलेल्या या माहितीवरून मारुतीनामक वानर, विरक्त पुरुष जसा संसारसागर सहज तरून जातो, तद्वत् दक्षिण समुद्रावरून उड्डाण करून पैलतीरीं गेला. तेथून लंकेंत शिरल्यावर, एखादी दिव्यौषधि विषवेलींनीं गुरफटून गेलेली असावी, तशी सीतादेवी एका वनांत राक्षसींच्या घोळक्यांत सांपडलेली आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. तिला त्यानें रामाची खूण म्हणून आणलेली अंगठी दिली. ती पाहतांक्षणींच जानकीच्या नयनांतून आनंदाश्रु वाहूं लागले. मारुतीनें तिला प्रियकराचा संदेश सांगून तिचें समाधान केलें. नंतर प्रतिबंध करूं पाहणाऱ्या रावणपुत्र अक्षाचा वध करून व इंद्रजिताच्या बंधनांतूनहि मुक्त होऊन त्यानें लंका जाळून टाकिली !

मग वैदेहीनें उलट खुणेसाठीं दिलेला चूडामणी घेऊन हनुमान पुनः रामाकडे आला. सीतेच्या त्या चूडामणीच्या स्पर्शानें रामाला सीताच जणूं आपणांपुढें आहे असें वाटलें आणि त्यानें डोळे मिटून क्षणमात्र त्या सुखाचा लाभ घेतला. सीतेचें कुशलवृत्त ऐकल्यावर रामचंद्र तिला भेटण्यास नितान्त उत्सुक झाला. आणि मध्यें लंकेभोवतीं पसरलेला अफाट महासागर म्हणजे केवळ एक खंदकच आहे असें त्यास वाटलें !

त्यानंतर भूमीवर व आकाशांतहि उड्डाण करणाऱ्या वानरसैन्यासह राम रावणाचें पारिपत्य करण्यासाठीं निघाला व समुद्रतीरावर येतो आहे तोंच रावणाचा भाऊ बिभीषण त्याच्याशीं स्नेह करण्यासाठीं आला. राक्षसांच्या राज्यश्रीनेंच त्यास अशी प्रेरणा केली कीं काय न कळे ! पुढील सर्व स्थिति लक्ष्यांत आणून रामानें बिभीषणाशीं सख्य केलें व रावणाचा वध केल्यावर 'तुझीच लंका राज्यावर स्थापना करीन' असें त्यास वचन दिलें. राजनीतींतील डावपेंच योग्य प्रकारें व योग्य वेळीं लढविले तर ते सफळ झाल्याखेरीज राहात नाहींत.*

---

* काले खलु समारब्धाः फलं बध्नन्ति नीतयः ।

नंतर रामानें वानरांकरवीं सागरावर सेतु बांधविला. सेतूकडे पाहून भगवान विष्णूला शयन करितां यावें म्हणून हा जणूं शेषच रसातलांतून वर आला आहे असें वाटे. त्या सेतुमार्गानें समुद्र उल्लंघून गेल्यावर रामानें लंकेला वानरांचा वेढा दिला आणि त्यायोगें जणूं लंकेभोंवतीं सोन्याचा दुसरा तटच उभारला.

वानर व राक्षस यांचीं सैन्यें एकमेकांशीं भिडलीं व भयंकर रणकंदन माजलें! वानर रामाचा जयघोष करूं लागले; राक्षस रावणाचा जयघोष करूं लागले. त्या घोषणेनें दाही दिशा दुमदुमून गेल्या! राक्षसांचे परिघ व हातोडे वानरांनीं फेकलेल्या झाडांनीं व दगडांनीं भग्न होऊं लागले. वानर आपल्या नखांनीं शस्त्रास्त्रांपेक्षां तीव्र जखमा करूं लागले व त्यांनीं फेकलेल्या शिळांनीं रावणाच्या हत्तींचा चेंदामेंदा होऊं लागला.

असें तुमुल युद्ध चालू असतां रावणानें कृत्रिम राम करवून सीतेसमोर त्याचा शिरश्छेद केला. तें दृश्य पाहून सीता मूर्च्छित झाली. पण त्रिजटा राक्षसीनें तिला सावध करून खरा प्रकार समजावून दिला. तेव्हां आपला प्राणनाथ जिवंत आहे असें कळून आल्यावर तिनें शोक टाकून दिला. पण प्रथम पतीचा अंत झाल्याची वार्ता खरी वाटली असतांहि आपण जिवंत कसें राहिलों याची तिला लाज वाटली!

रावणपुत्र इंद्रजित यानें मोठा पराक्रम करून नागमय बाणांनीं रामलक्ष्मणांस बांधून टाकिलें. त्यामुळें ते निमिषमात्र भूमीवर निपचित पडले. तोंच गरुडाच्या आकस्मित आगमनानें नागपाशांतून मुक्त होऊन स्वप्नांतून जागे झाल्यासारखे ते उठून उभे राहिले. तें पाहून रावणानें दांत ओंठ चावून लक्ष्मणावर एक तीक्ष्ण शक्ति फेकली व त्याच्या हृदयावर प्रहार केला. त्यावेळीं शस्त्रप्रहार न होतांहि केवळ दुःखातिरेकानें रामाचें हृदय विदीर्ण

होऊन गेलें. पण मारुतीनें संजीवनी औषधी तत्काळ आणून लक्ष्मणाची व्यथा नाहींशी केल्यामुळें लक्ष्मण सावध झाला व पुनरपि राक्षसांचा संहार करूं लागला. त्यानें इंद्रजिताचें धनुष्य मोडून व त्याला ठार करून त्याचा सिंहनाद बंद केला.

अशा आणीबाणीच्या वेळीं आपणांस कुंभकर्ण उपयोगी पडेल असें वाटून रावणानें त्याला जागें करविलें. चांगला जागा झाल्यावर तो गिरिशृंग घेऊन आवेशानें रामावर धावला. तेव्हां ' तूं निद्रामय असतां निष्कारण तुझ्या भावानें तुला जागें केलें' असें सांगण्यासच कीं काय, रामचंद्रानें त्याच्यावर बाण सोडून त्याला महानिद्रा घ्यावयास लाविलें !!

कुंभकर्णाची भयंकर निधनवार्ता ऐकून आतां 'जगत् रावणविरहित तरी होणार किंवा रामरहित तरी होणार' अशी निश्चयाची सिंहगर्जना करीत चौदा चौकड्यांचा सम्राट् रावण पुन्हां युद्धासाठीं मंदिरांतून बाहेर पडला. तेव्हां रथसंचारी रावण व पादसंचारी राम यांचें विषम युद्ध होणार असें जाणून इंद्रानें मातलीबरोबर घोडे जोडलेला रथ रामाकडे पाठविला. त्या रथा-वरील ध्वज मंदाकिनीवरून वाहात आलेल्या वाऱ्यानें फडफडत होता. राम मातलीचा हात धरून रथांत बसल्यावर मातलीनें इंद्राचें कवच त्याच्या अंगावर चढविलें व तेणेंकरून रामावर रावणाचीं अस्त्रें व्यर्थ होऊं लागलीं !

रामरावण यांना तुल्य प्रतिस्पर्धी मिळाल्यानें त्यांचें युद्ध अद्वितीयच झालें. रावणाबरोबर यावेळीं पूर्वीप्रमाणें कांहींच परिवार नव्हता; तथापि तो एकटा असूनहि त्याचीं दहा तोंडें, वीस हात इत्यादिकांमुळें आपल्या मातृवंशीय बांधवांनीं घेरल्यासारखा दिसला. रावणानें इंद्रादि लोकपालांना पादाक्रान्त केलें होतें; कैलासनाथाला आपलीं मस्तकें अर्पून संतुष्ट केलें होतें; आणि एकदा तर प्रत्यक्ष कैलासपर्वत गदगदां हलविला

होता; असा शौर्यवीर्यसंपन्न प्रतिपक्षी मिळाल्यामुळें रामाला त्याच्याबद्दल कौतुक व आदर वाटला.

रामचंद्राचा उजवा बाहु स्फुरण पावून जानकीची प्राप्ति लवकरच होणार असें सुचवूं लागला, तोंच त्याच्यावर रावणाचा बाण येऊन पडला. उलट रामानें सोडलेला बाणहि रावणाच्या हृदयांत घुसला आणि त्याच्या लवकरच होणाऱ्या वधाची प्रिय वार्ता नागलोकांना सांगण्यासाठींच जणूं काय पृथ्वीचा भेद करून पाताळांत गेला.

मग रावणानें रामावर शतघ्नी फेकली. पण ती उद्दिष्ट स्थानीं पोंचण्यापूर्वींच, केळीचा खांब तुटावा, त्याप्रमाणें रामाच्या बाणानें मध्येंच तुटून पडली व तिच्याबरोबर राक्षसांची जयाशाहि नष्ट झाली !

शेवटीं एकमेकांनीं एकमेकांवर विविध अस्त्रांचे प्रयोग चालू केले. कांहीं वेळ कोणीहि कोणास हार जाईना. जयश्री रामाला माळ घालणार असें एकदां दिसे, तों ती पुनः रावणाकडे वळल्यासारखी वाटे. अर्थात् त्या त्या क्षणीं, देव आणि असुर त्यांच्यावर पुष्पवृष्टि करीत, पण ती परस्परांच्या बाणवृष्टीमुळें खालीं पोंचेना !

अखेरीस त्या अद्वितीय धनुर्धारी रामानें आपल्या प्रिय सीतेच्या हृदयांतील शोकशल्य ओढून काढण्याचें साधनच असें आपलें ब्रह्मास्त्र रावणावर सोडिलें. त्याचा प्रहार होतांच मात्र रावणाची शीर्षपंक्ति निमिषार्धांत तुटून मुळींच वेदना न होतां खालीं आदळली. पण तीं मस्तकें रावणाच्या धडाला फिरून फुटतील कीं काय अशी देवांना शंका वाटली ! तथापि तसें कांहीं न होतां रावण गतप्राण होऊन पडला आणि रामाच्या मस्तकावर देवांनीं केलेली पुष्पवृष्टि पडली ! नंतर देवांचें कार्य रामाच्या हातून पार पडलें असें पाहून मातली रामाचा निरोप घेऊन स्वर्गलोकीं परत गेला.

# कथा एकविसावी

## विमानसंचार !



यानंतर रामानें सीतेला अग्निद्वारा शुद्ध करून तिचा स्वीकार केला आणि आपल्या वचनाप्रमाणें रावणाच्या पश्चात् बिभीषणाची लंकेच्या सिंहासनावर स्थापना केली. मग रावणापासून जिंकून घेतलेल्या पुष्पक नामक विमानांत बसून तो सर्व परिवारासह अयोध्येस जावयास निघाला. विमान चालू झालें. तें अंतरिक्षांत गेल्यावर समुद्र दिसूं लागला तेव्हां राम सागराकडे बोट दाखवून सीतेला म्हणाला—

"वैदेहि, हा पाहा फेसाळलेला अफाट समुद्र ! मलयपर्वतापासून बांधलेल्या आमच्या सेतूनें याचे कसे दोन भाग केले आहेत पाहा ! निरभ्र आकाशांतील रमणीय तारकागणाचे, आकाशगंगेच्या पट्टयामुळें असेच दोन भाग होतात. सीते, हा उदधि पूर्वीं आकुंचित होता, पण सगर नामक आमच्या पूर्वजांचा यज्ञिय अश्व कपिलानें पाताळीं नेऊन ठेवला असतां, त्याच्या शोधार्थ भूमि खणल्यामुळें याचा विस्तार वाढला आहे. सूर्याचे किरण येथूनच मेघोत्पत्ति करितात. जलभक्षक वडवाग्नीचें याच्याच उदरांत पोषण होत असतें ! सर्व जगास आल्हाद देणारा चंद्रमा याच्याच पोटीं जन्मास आला. रत्नांचा तर हा आकरच आहे ! निरनिराळ्या अवस्था धारण करीत दाही दिशा व्यापून उरणारें भगवान परमात्म्याचें रूप अमुक प्रकारचें किंवा अमुक प्रमाणाचें आहे असें सांगतां येत नाहीं; तसेंच या सागराचेंहि आहे. आपल्या नाभिकमलावर बसून ब्रह्मदेव गात असलेली आपली स्तुति ऐकत, भगवान विष्णु युगान्तीं सृष्टीचा संहार केल्यावर योगनिद्रा घेण्यासाठीं सागरावरच पहुडतो ! प्रिये, इंद्र जेव्हां पर्वतांचे पंख

छाटूं लागला. त्यावेळीं यानेंच कित्येक पर्वतांना आपल्या पोटांत आसरा दिला होता. शत्रूंनीं राज्य घेरलें असतां दुर्बळ राजेहि अशाच रीतीनें मध्यस्थ नृपतीचा आश्रय करतात.

सीते, हे पाहा हत्तीसारखे अजस्र नक्र उड्या मारीत आहेत. समुद्रावरील फेसाच्या ओळी या नक्रांनीं कशा द्विधा होत आहेत. मगरसुसरीच्या कपोलां-वरून उडणारा हा फेस जणूं काय त्यांच्यावर चवऱ्या वारीत आहे. याच्यांतून पाणी घेणारा मेघ भोंवऱ्यांत सांपडून गरगरा फिरूं लागल्यामुळें मंदर-गिरीच्या द्वारा पुनः समुद्रमंथन चाललें आहे असें दिसतें. सीते, बघ आपलें विमान कसें वेगानें चाललें आहे तें. एका मुहूर्तांत आपण कसे पैलतीराला येऊन पोंचलों ! येथें उद्यानांतील पूगवृक्ष पोफळांनीं भरलेल्या शिंपुटांनीं कसे वाकले आहेत पाहा.

हे मृगानने, जरा मागें दृष्टि वळव म्हणजे ही भूमि दूर दूर जाणाऱ्या समुद्राच्या पोटांतून जणूं काय बाहेर निघते आहे अशी तुला दिसेल. सीते, हें विमान आपल्याला हवें तसें, कांहीं देवमार्गानें, कांहीं मेघमार्गानें तर कांहीं पक्षिमार्गानें चाललें आहे. हे सुभगे, तूं खिडकींतून बाहेर हात काढून ह्या मेघाला कौतुकानें हात लाविलास तेव्हां ह्या मेघांतून निघालेली वर्तुळाकार विजेची चमक हा त्यानें तुला दुसरा अलंकारच दिला आहे असें मला वाटलें.

जानकि, हीच ती जागा; तुला शोधीत असतांना तुझ्या पायांतील एक नूपुर येथेंच गळून पडलेलें मला आढळलें. तुझ्या वियोगानें तें जणूं मौन धरून बसलें होतें. हे भीरु, राक्षसानें तुला ज्या मार्गानें नेलें तो मार्ग या लतांनीं आपल्या शाखा वळवून पल्लवांगुलींनीं मला दाखवून दिला. काय करतील बिचाऱ्या ! बोलतां येत असतें तर त्यांनीं स्पष्ट सांगितलें असतें. हरि-णींनींसुद्धां आपले डोळे दक्षिणेकडे वळवून तीच गोष्ट सुचविली.

सीते, आपल्या विमानाला लाविलेल्या सोन्याच्या घुंगुरांचा शब्द ऐकून गोदातीरावरून वर उडून येणारे हे सारसांचे थवे तुला जणूं काय सामोरेच येत आहेत. आतां आपण पंचवटीला आलों. केवढा काळ लोटला ! हे आम्रवृक्ष पाहा. तूंच घातलेल्या पाण्यानें हे वाढलेले आहेत. हे कृष्णमृग सुद्धां आपल्याकडेच डोळे लावून उभे आहेत. हें स्थान पाहून कोणाला आनंद होणार नाहीं ? मृगयेनें श्रान्त होऊन आल्यावर येथेंच लतागृहांत तुझ्या अंकावर मस्तक ठेवून मी श्रमपरिहारार्थ शयन करीत असें.

आतां हा चित्रकूट आला. याच्या भोंवतीं वाहणारी मंदाकिनी म्हणजे भूदेवीच्या गळ्यांतील मोत्यांची माळच होय ! या पर्वता-लगतचा हा तमाल वृक्ष पाहा. याचीच मंजिरी खुडून मी तुझ्या केसांत खोवली होती. हा बघ येथून जवळच अत्रिमुनींचा आश्रम. याच ऋषींच्या आश्रमांतील वृक्षांना फुलें न येतां फळें धरतात. महामुनींना जवळच स्नान करितां यावें म्हणून पतिव्रता अनसूयेनें मंदाकिनीचा प्रवाह येथून वाहावयास लाविला असें म्हणतात. हिच्यांत उगवलेलीं सुवर्णकमलें सप्तर्षि आपल्या हातांनीं खुडून पूजेसाठीं घेतात. वीरासन घालून ध्यान करणाऱ्या ऋषिवर्यांच्या समीप असलेले हे वृक्ष या निर्वात प्रदेशांत इतके निष्कंप आहेत कीं, जणूं ते समाधि लावून बसले आहेत असें वाटतें. सीते, तूं ज्याला नवस केला होतास तोच हा श्यामवट.

ही गंगायमुनांची जोडी आली. एक शुभ्र व एक कृष्ण; जणूं इंद्रनील व मोत्यें यांचे एके ठिकाणीं मांडलेले सरच ! किंवा मानससरोवरनिवासी शुभ्र हंसांची रांग कदंबवृक्षाच्या छायेला बसलेली आहे असें म्हटलें तरी चालेल. एकीकडे कृष्णसर्पाचें वेष्टण व दुसरीकडे भस्माचा पट्टा अशा महेश्वराच्या रूपाप्रमाणें हा गंगायमुनांचा संगम दिसतो आहे. या नद्यांच्या

मित्र सुग्रीव; युद्धांत मला साहाय्य करणारा हा पुलस्त्यपुत्र बिभीषण' असें म्हणून भरतास त्यांची ओळख करून दिली. तेव्हां भरतानें सर्वांस वंदन केलें.

शेवटीं रामाच्या आज्ञेवरून वानरसेनाधिपतींनीं सुंदर वेष धारण करून गजांवर आरोहण केलें. बिभीषणहि स्वतः एका रथांत बसला. रामानें भरतलक्ष्मणांसह पुनः कामगति विमानांत आरोहण केलें आणि ती मंडळी अयोध्येबाहेरील विस्तीर्ण उद्यानांत येऊन खालीं उतरली.

---

# कथा बाविसावी
## रामराज्य



रामलक्ष्मण अयोध्या नगरीच्या उपवनांत येऊन उतरल्यावर त्यांच्या माता कौसल्या व सुमित्रा दोवीहि त्यांना भेटण्यासाठीं आल्या. पतिनिधनामुळें त्यांची मन:स्थिति आश्रयवृक्ष तुटून गेलेल्या लतांप्रमाणें शोचनीय झाली होती. रामलक्ष्मणांनीं त्यांना नमस्कार केला, तेव्हां त्यांचे डोळे पाण्यानें भरून आले; म्हणून त्यांना मुलांचीं मुखकमलें दिसलीं नाहींत; तथापि त्यांना आलिंगन देऊन पुत्रस्पर्शसुखाचा अनुभव त्यांनीं घेतलाच. त्यावेळीं त्यांच्या नेत्रांतून आनंदाचे शीत अश्रु निघून त्यांनीं पूर्वींच्या शोकोत्पन्न उष्ण अश्रूंना घालवून दिलें ! हिमालयावरून वाहात येणारा थंड पाण्याचा प्रवाह खालीं उतरून उष्ण काळीं गंगासरयूंच्या तप्तजलाला असेंच दूर सारितो.

मग सीता पुढें आली आणि ‘ भर्त्याला क्लेश देणारी ही मी हतभागिनी सीता आपणांस वंदन करीत आहें ’ असें सासूबाईंस म्हणाली. ‘ मुली, असें कसें म्हणतेस ? तुझ्याच पुण्याईनें रामलक्ष्मणांना संकटांतून पार पडतां आलें; ऊठ बरं ’ असें म्हणून त्यांनीं तिला उठविलें.

वसिष्ठप्रभृति ऋषींनीं तेथेंच नगराबाहेर रामाच्या अभिषेकाची सर्व सिद्धता केली. कौसल्या व सुमित्रा यांनीं आपल्या आनंदाश्रूंनीं रामाला अभिषेक करण्यास प्रारंभ केलाच होता. वानरांनीं अनेक ठिकाणच्या पवित्र क्षेत्रांतील उदक सुवर्णकुंभांतून आणल्यावर वृद्ध अमात्यांनीं तें मंगलकृत्य पूर्ण केलें. राम तपस्व्याच्या वेषांतहि रमणीय दिसत होता; आतां तर सार्वभौम राजाचा वेष परिधान केल्यावर तो अधिकच रम्य दिसूं लागला !

सारथि सुमंत रत्नांनीं श्रृंगारलेला आठ घोड्यांचा राजरथ घेऊन आला. त्यांत रामचंद्र व सीता बसल्यानंतर भरतानें त्यांच्यावर छत्र धरलें; लक्ष्मण चवऱ्या ढाळूं लागला. अयोध्येच्या मार्गानें रथ हळू हळू चालूं लागला. दुतर्फा मोठमोठ्या वाड्यांतून कृष्णचंदनादि धूपाचे लोटच्या लोट चालले होते व ते वायूनें इतस्ततः पसरल्यामुळें वनवासाहून परत आलेल्या रामानें आपल्या हातानें सोडलेल्या अयोध्यापुरीच्या वेणीप्रमाणें भासूं लागले ! प्रासादांवरील चंद्रशालेवरून सीता व राम यांच्यावर लाह्यांचा वर्षाव होऊं लागला. पौरस्त्रिया आपापल्या घरांच्या खिडक्यांतून सीतादेवीस हात जोडून नमस्कार करूं लागल्या. अनसूयेनें दिलेलें उटणें सीतेनें अंगाला लावल्यामुळें तिच्याभोंवतीं एक तेजोवलय दिसत होतें. सीता विशुद्ध असून अग्निज्वालेंत उभी आहे असें या प्रभामंडलाच्या मिषानें जणूं काय राम लोकांना दर्शवीत होता !

याप्रमाणें मिरवणूक चालून राजवाड्यापाशीं आली. तेथें प्रेमळ अशा त्या रामप्रभूनें आतां प्रतिमारूपानेंच राहिलेल्या आपल्या पित्याच्या वाड्यांत खिन्नांतःकरणानें प्रवेश केला. आंत कैकेयी बसली होती. तिच्यापुढें रामचंद्रानें हात जोडले आणि 'आई, माझे तात स्वर्गप्राप्ति करून देणाऱ्या सत्यापासून ढळले नाहींत हें तुझ्याच सुकृताचें फळ होय' असें म्हणून त्यानें तिचें समाधान करण्याचा प्रयत्न केला.

रामचंद्राचें अभिनंदन करण्यासाठीं नानाठिकाणचे ऋषीहि आले होते. त्यांनीं रावणाचा अचाट पराक्रम वर्णिला आणि अशाहि शत्रूचा तूं निःपात केलास, तेव्हां तुझें अलौकिक सामर्थ्य काय वर्णावें असें म्हटलें. रामानें त्यांचा यथोचित गौरव करून त्यांची पाठवणी केली; व सीतेच्या हातून सर्व पाहुणेमंडळींची वस्त्रालंकारांनीं संभावना करून

त्यांचीहि बोळवण केली. पुष्पक विमानासहि कुबेराकडे जाण्यास त्यानें अनुमति दिली.

याप्रमाणें आनंदोत्सवांत बोलतां बोलतां आठ पंधरा दिवस सहज निघून गेले.

रामराज्य सुरू झालें. आपल्या माता ज्या सहा कृत्तिका त्यांच्याशीं कार्तिकेय जसा समत्वानें वागे तसा राम सर्व मातांस सारखाच प्रेमळ-पणा दाखवूं लागला. त्याची वृत्ति निर्लोभ असल्यामुळें लोक धनाढ्य झाले; त्यानें सर्वप्रकारचीं विघ्नें नष्ट केल्यामुळें लोकांचें धर्मानुष्ठान नीट चालूं लागलें; त्याच्या न्याय्य अनुशासनामुळें लोक शीलवान झाले; आणि राम त्यांचें दुःख नित्य दूर करीत असल्यामुळें ते रामाला पुत्राप्रमाणेंच लेखूं लागले.

रामचंद्र यथोचित काळीं राज्यकारभाराचीं कामें पार पाडून प्रसंगीं विषयोपभोगहि घेत असे. आपल्या साध्वी पत्नीचें मन संतुष्ट ठेवण्याची तो पराकाष्ठा करी. भूतलावर आलेली ही लक्ष्मीच आहे असें त्यास वाटे.

राजमंदिरांतील भिंतींवर दंडकारण्यांत अनुभविलेल्या प्रसंगांचीं चित्रें काढलेलीं होतीं. त्या ठिकाणीं बसून प्रसंगोपात्त राम सीतेशीं भाषण करीत असतां, चित्रदर्शनानें त्या दुःखांचा विचार मनांत येऊन त्यांना खेद न वाटतां सात्त्विक सुखच होई.*

अशा रीतीनें कांहीं दिवस गेले असतां, सीतेच्या तोंडावर एक प्रकारचा पांढुरकेपणा आला आहे व डोळ्यांत एक प्रकारची चमक उत्पन्न झाली आहे यावरून तिला डोहाळे लागले आहेत असें कोणी न सांगतां एके दिवशीं रामाच्या ध्यानांत आलें. त्याला आनंद झाला. त्यानें सीतेला

---

* प्राप्तानि दुःखान्यपि दण्डकेषु संचिन्त्यमानानि सुखान्यभूवन् ।

तुझी काय इच्छा आहे असें प्रेमानें विचारिलें. तेव्हां ती लाजत लाजत म्हणाली—

'गंगातीरावरील तपोवनांत जाऊन कांहीं दिवस राहावेंसें वाटतें.'

'ठीक आहे, तसें करूं' असें रामानें आश्वासन दिलें. आणि आपल्या नगरांतले लोक कसे काय आनंदानें काळ घालवीत आहेत तें पाहावें या हेतूनें तो आपल्या वाड्याच्या गच्चीवर गेला. तेव्हां ती भरभराटलेली बाजारपेठ व सरयूंतून नौकाविहार करणारे विलासी स्त्रीपुरुष पाहून त्याला समाधान वाटलें. इतक्यांत रामाकडे भद्र नामक एक हेर आला. त्याला त्यानें सहज विचारिलें, 'भद्रा, लोक मजविषयीं काय रे बोलतात?' फारच आग्रह केल्यावर त्यानें उत्तर केलें—

'महाराज, जो तो आपल्या गुणांची वाहवा करून स्तुतीच करतो; पण रावणाच्या घरीं राहिलेल्या सीतेचा आपण पुनः स्वीकार केला याबद्दल मात्र लोक आपणांस दूषण देत आहेत.'

हे शब्द ऐकतांच, तापलेल्या लोखंडावर घणाचा घाव मारावा त्याप्रमाणें, रामाचें हृदय दुःखानें विदीर्ण होऊन गेलें!

---

# कथा तेविसावी

## लोकाराधन कीं पत्नीत्याग ?



'मजविषयींच्या लोकापवादाची उपेक्षा करूं, कीं आपल्या निर्दोष पत्नीचा त्याग करूं?' असा पेंच येऊन पडल्यानें रामाचें चित्त द्विधा होऊन तें झोपाळ्यावर बसल्याप्रमाणें हेलकावे खाऊं लागलें. शेवटीं त्याच्या मनानें असा निर्णय दिला कीं, सीतात्यागाखेरीज हा लोकापवाद धुऊन टाकण्यास अन्य उपाय नाहीं. ज्यांना कीर्तीची चाड असते त्यांना आपल्या देहापेक्षां यश महत्त्वाचें वाटतें; मग इतर भोग्य विषयांची कथा काय ? †

मग बराच वेळ एकान्तांत बसून रामानें आपल्या मनाशीं कांहीं निश्चय ठरविला व तो सांगण्यासाठीं, द्वारपालास हांक मारून आपल्या तिन्ही बंधूंस एकत्र बोलाविलें. ग्रहण लागलेल्या चंद्राप्रमाणें रामचंद्राचें निस्तेज व खिन्न वदन पाहून त्यांचा आनंद पार मावळला.

आपणांविषयीं काय जनापवाद उठला आहे तो सांगून राम त्यांस म्हणाला—

'प्रिय बंधूंनो, माझें आचरण शुद्ध असतांहि, मोठमोठे राजर्षि ज्या वंशांत होऊन गेले त्या ह्या सूर्यवंशावर आज काय हा कलंक लागत आहे पाहा! आरशावर पाणी पडून त्याला मलिनपणा आला तर त्यांत आरशाचा काय बरें दोष ? पण मी कितीहि निर्दोषी असलों तरी पाण्याच्या लाटांत पडलेल्या तैलबिंदूप्रमाणें लोकसमाजांत त्वरेनें पसरणारा हा प्रवाद मला सहन करवत नाहीं. तो दूर करणें मला अवश्य

† अपि स्वदेहात्किमुतेन्द्रियार्थाद्यशोधनानां हि यशो गरीयः ।

वाटतें व त्यासाठीं अपत्यजन्म समीप आला असतांहि सीतेचा त्याग मला केला पाहिजे. चालत आलेल्या राज्यलक्ष्मीचा मी पित्राज्ञापालनासाठीं पूर्वींहि नाहीं का त्याग केला ? सीता सर्वस्वी निर्दोष आहे हें मी पक्कें जाणतों; पण हा लोकापवादहि भयंकर नाहीं का ? चंद्रमा शुद्ध असतांहि त्यावर पडलेल्या भूमीच्या छायेला लोक डागच समजतात.‡

बंधूंनो, तुम्ही असें म्हणाल कीं, शेवटीं असें करावयाचें होतें तर रावणवधाचा एवढा उपद्व्याप कशाला केला ? मी म्हणतों तो व्यर्थ गेला नाहीं. शत्रूचा सूड उगविण्यासाठीं तसें करणें अवश्य होतें. आपल्या शरिरावर पाय देणाऱ्याला क्रोधाविष्ट झालेला सर्प डसतो तो काय रक्त पिण्याच्या इच्छेनें ?§ तर माझ्या अपवादाचें शल्य बाहेर निघून मी जिवंत राहावें असें तुम्हांस वाटत असेल तर कृपा करून तुम्ही माझ्या या कृत निश्चयाच्या आड येऊं नका.'

रामाचा हा कठोर संकल्प ऐकून भावांच्या पोटांत धस्स झालें. रामाला अनुमोदन द्यावें कीं त्याचा निश्चय मोडून काढावा यांपैकीं कांहींच न सुचून त्यांना कसेंसेंच झालें. तेव्हां लक्ष्मणाला एकीकडे बोलावून रामानें म्हटलें,

" लक्ष्मणा, तुझ्या भावजयीला डोहाळे लागल्यामुळें तपोवनांत जाण्याची इच्छा झालीच आहे. तर त्याच निमित्तानें तूं तिला रथांत घालून वाल्मीकीच्या आश्रमासन्निध ने आणि तेथें सोडून दे." वडिलांच्या आज्ञेची चर्चा करूं नये|| असें मनांत आणून 'होय, तसें करितों' असें लक्ष्मणानें म्हटलें. पूर्वीं भार्गवरामानेंहि पित्याची आज्ञा अशीच मानून मातेचा वध केला होता हें त्यास ठाऊक होतें.

---

‡ छाया हि भूमेः शशिनो मलत्वेनारोपिता शुद्धिमतः प्रजाभिः ।

§ अमर्षणः शोणितकाङ्क्षया किं पदा स्पृशन्तं दशति द्विजिह्वः ।

|| आज्ञा गुरूणां ह्यविचारणीया ।

लगेच सुमंत्रानें रथ जुंपला आणि त्यांत सीतेला बसवून लक्ष्मण वाट चालूं लागला. सीता मनांत मांडे खात होती कीं, आपण जें सांगावें तें आपला पति करीत असतो. पण त्यानें असला हा कल्पवृक्षपणा टाकून तरवारीच्या धारेचें रूप घेतलें होतें हें बिचारीला काय माहीत ? लक्ष्मणानें तिला वस्तुस्थितीची कल्पना न येऊं देण्याचा प्रयत्न केला, तथापि तिचा उजवा डोळा स्फुरण पावूं लागल्यामुळें, आपणांवर कांहीं-तरी संकट कोसळतें आहे असें तिला कळून चुकलें. तिच्या मनाला धसका बसला. तिचें मुखकमल म्लान झालें; आणि मनांतल्या मनांत राम व त्याचे बंधु यांचें कल्याण होवो अशी ती प्रार्थना करूं लागली.

गंगेच्या कांठीं आल्यावर सुमंत्रानें घोडे आवरून रथ उभा केला. सीतेला घेऊन लक्ष्मण खालीं उतरला. निषादपतीनें आणलेल्या नावेंतून तीं सर्वजणें भागीरथीच्या पैलथडीस गेलीं; तसा लक्ष्मणहि आपल्या कर्तव्यांतून पार पडला.

मग सीतेला नावेंतून उतरून तीरावर घेतल्यावर लक्ष्मण रामाची आज्ञा तिला सांगूं लागला. कांहीं काल त्याचा गळा दाटून आल्यामुळें त्याच्यानें बोलवेना. शेवटीं मन घट्ट करून त्यानें तिला सर्व वृत्तान्त सांगितला. प्रलयकालीन मेघानें पाषाणांचा वर्षाव करावा तसें होऊन सीता एकाएकीं आपल्या धरणीमातेच्या अंकावर पडली. तेव्हां वास्तविक म्हटलें तर धरणी-मातेनें आपल्या कन्येला पोटांतच घ्यावयाचें, पण इक्ष्वाकुवंशोत्पन्न सदा-चरणी पति अशा साध्वी पत्नीचा एकाएकीं त्याग कसा करील या विचारानें तिनें तसें केलें नाहीं.

सीतेला तर मूर्च्छेमुळें दुःखाची जाणीव नाहींशी झाली होती. पण लक्ष्मणानें कांहीं उपाय करून तिला सावध केल्यावर मात्र तिचें हृदय जळूं लागलें. कशाला आपण सावध झालों असें तिला वाटलें. तथापि त्या

साध्वीनें पतीला मुळींच नांवें न ठेवितां आपल्याच दुर्दैवाला पुनः पुनः दोष दिला. तेव्हां लक्ष्मण तिला म्हणाला—

"हे देवि, मी केवळ आज्ञेचा बंदा आहें, मला क्षमा कर." असें बोलून त्यानें तिला वाल्मीकींच्या आश्रमाची वाट दाखविली; आणि क्षमा मागण्यासाठीं तिच्यापुढें लोटांगण घातलें. तेव्हां सीता त्याला वर उठवून म्हणाली—

'लक्ष्मणभावजी, शतायुषी व्हा; तुमचा यांत काय दोष ? तुम्ही पराधीन आहांत हें काय मला ठाऊक नाहीं ? आतां एवढेंच करा; माझे नंम्र प्रणाम माझ्या सर्व सासूबाईंना सांगा आणि गर्भस्थ अशा आपल्या भावी नातवाचें कल्याण चिंतण्याची त्यांना विनंती करा. राजालाहि माझा निरोप सांगा कीं,

तूं आपल्यासमक्ष अग्नींतून मला शुद्ध करून घेतलें असतांहि, केवळ लोकप्रवाद ऐकून माझा त्याग केलास ही गोष्ट तुझ्या ज्ञानीपणाला व कुलकीर्तीला शोभणारीच झाली ना ? पण माझा तूं त्याग केलास तो स्वेच्छेनें केलास असें म्हणण्याचें कारण नाहीं. माझीं जन्मजन्मान्तरींचीं पातकें फळास येऊन माझ्यावर हा वज्राघात झाला आहे. किंवा असेंहि असेल कीं, पूर्वीं तूं चालत आलेल्या राज्यलक्ष्मीचा माझ्यासाठीं त्याग केलास याचा विषाद वाटून त्या राज्यलक्ष्मीनें अधिकार प्राप्त झाल्याबरोबर रागारागानें माझी उचलबांगडी केली !

राजा, दंडकारण्यांत राक्षसांनीं ऋषींना सळो कीं पळो करून सोडलें असतां, ऋषिपत्नींना अभय देण्याचें सामर्थ्य तुझ्या कृपेमुळें माझ्या ठिकाणीं होतें. पण त्याच मला, तूं आज सिंहासनावर विराजमान असतांहि, दुसऱ्याला शरण जाण्याचा प्रसंग आला आहे ! अशा प्रसंगीं तूं मला कायमचा

अंतरणार या जाणिवेनें या हतभागी जीविताचा त्याग करावा असेंहि वाटतें. पण मी गर्भरूपानें धारण करीत असलेलें तुझें तेज राखणें अवश्य असल्यामुळें तसें मला करतां येत नाहीं. आतां मी सूर्याकडे डोळे लावून प्रसूतिकालापर्यंत तप करीत राहाणार ! पुढील जन्मीं तरी पति म्हणून तुझी प्राप्ति झाल्यावर वियोग न व्हावा, एवढीच इच्छा. राजा, आतां मी तपस्विनी झालें आहें; वर्णाश्रमाचें पालन करणें हें राजाचें कर्तव्य म्हणून मनूनें सांगितलें आहे. यास्तव तूं माझा त्याग केला असलास तरी या स्थितींतहि एक तपस्विनी म्हणून माझें रक्षण करणें तुझें कर्तव्य आहे.'

हा निरोप सांगेपर्यंत सीतेच्या नेत्रांत अश्रु निघाला नव्हता; पण तो ऐकून लक्ष्मण पाठ फिरवून निघाला तेव्हां मात्र तिच्या दुःखाचा कहर झाला आणि एकाद्या टिटवीप्रमाणें ती गळा काढून रडूं लागली. तिचा शोक पाहून सारें वन तिच्याशीं समरस होऊन गेलें. मोरांनीं आपलें नृत्य थांबविलें; वृक्षांनीं फुलांचा त्याग केला; आणि तोंडांत घेतलेले दर्भांचे घासहि हरिणींच्या तोंडांतून गळून पडले !

असा ती शोक करीत असतां, तिचें रुदन ऐकून वाल्मीकि मुनि तिच्या-जवळ आले. दर्भ आणण्यासाठीं ते बाहेर निघाले होते. या ऋषींची अशी कथा आहे कीं, निषादानें पूर्वी केलेला क्रौंचवध पाहून त्यांना जो शोक झाला, तो श्लोकरूप होऊन मुखावाटे बाहेर पडला होता. ऋषि समीप येतांच सीतेनें डोळे पुसले व त्यांना वंदन केलें; वाल्मीकींनींहि ती गरोदर आहे असें पाहून तिला 'सुपुत्रवती हो' असा आशीर्वाद दिला. मग त्यांनीं तिला शान्त केलें व म्हटलें,

"बाळे, मिथ्यापवादाला भिऊन तुझ्या पतीनें तुझा त्याग केला हें मला अंतर्दृष्टीनें समजलें. मग आतां खेद करूं नकोस. तूं आपल्या पित्याच्या घरीं आली आहेस असें समज. त्रैलोक्यकंटक रावणाचा नाश

करून रामानें आपली प्रतिज्ञा पाळली; पण आतां असलें दुष्ट आचरण त्यानें निष्कारण केलें हें पाहून मला त्याचा रागच आला आहे. महाकीर्तिशाली तुझे श्वशुर दशरथ माझे मोठे स्नेही होते; तुझा पिता जनक विद्वानांनाहि आत्मज्ञान देणारा आहे; आणि तूं पतिव्रतांमध्यें अग्रगण्य आहेस; मग तुझ्याविषयीं माझ्या मनांत अनुकंपा काय म्हणून नसावी ? आतां या माझ्या तपोवनांत निर्भयपणें राहा; येथील क्रूर पशूहि तपस्वी लोकांच्या संगतीनें कसे अगदीं सौम्य झाले आहेत ! तुझी सुखानें प्रसूति झाली म्हणजे येथेंच तुझ्या पुत्राचे संस्कार करूं.

सीते, पापहर्त्या तमसानदीचें स्नान करून तिच्या ह्या वाळवंटावर देवतापूजन कर म्हणजे तुझ्या मनाला प्रसन्नता प्राप्त होईल. ह्या कन्यका वेळोवेळीं मिळणारीं फुलें, फळें व बीजें तुला पुरवितील व तुझें मन रिझवतील. तूंहि झेपतील तेवढे घट घेऊन या आश्रमांतील लहानवृक्षांना पाणी घालीत जा म्हणजे पुत्रप्राप्ति होण्यापूर्वीं अपत्यवात्सल्याचा तुला अनुभव येईल."

असें सांगून ते कनवाळु मुनि सीतेला आश्रमांत घेऊन गेले व तिला त्यांनीं तापसकन्यकांच्या स्वाधीन केलें. मग सायंकाळीं त्या तापसकन्यकांनीं तिला एक पर्णशाला दिली, तींत शय्या म्हणून मृगाजिन पसरिलें व इंगुदीच्या तेलाचा दिवा लावून ठेविला.

अशा रीतीनें सीता तपस्विवृत्ती स्वीकारून केवळ पतीच्या वंशरक्षणासाठीं कसेंबसें शरीर धारण करून तेथें राहूं लागली.

# कथा चोविसावी
## मथुरापुरीची स्थापना



अयोध्येस परत आल्यावर लक्ष्मणानें सीतेचा निरोप रामचंद्रास सांगितला. तेव्हां रामाच्या नेत्रांतून घळघळा अश्रुधारा वाहूं लागल्या ! त्यानें सीतेला घरांतून घालविली असली तरी मनांतून घालविली नव्हती. तथापि धैर्यानें शोक आवरून तो बंधूंसहवर्तमान वर्णाश्रमधर्मानुसार आपलें राजकर्तव्य जागरूकतेनें पाहूं लागला. आतां राजलक्ष्मीलाहि कोणी सपत्नी उरली नसल्यामुळें ती राजावर अधिकच अनुरक्त होऊन शोभूं लागली.

पुढें रामचंद्रानें यथाकाळीं यज्ञानुष्ठान केलें व त्यावेळीं सीतेची सुवर्णप्रतिमा पत्नीच्या जागीं ठेविली. सीतेच्या कानीं जेव्हां हें वृत्त पडलें, तेव्हां दु:सह असलेलें त्यागदु:ख तिला कसेंबसें सहन करितां आलें.

याप्रमाणें राम राज्य करीत असतां यमुनातीरवासी मुनि त्याच्याकडे आले व म्हणाले, ' राजा, मधूचा पुत्र लवण आमच्या यज्ञकर्मांत विघ्न करीत आहे त्यापासून आमचें रक्षण करावें. "

राम रक्षणकर्ता असल्यामुळें ऋषिगणांनीं स्वत: लवणाचें पारिपत्य करण्याचें काम हातीं घेतलें नाहीं. दुसरा कोणी रक्षणकर्ता नसेल तरच तपस्वी लोक शापानें शासन करण्यासाठीं तपाचा व्यय करितात; नाहींतर नाहीं. *

रामाचा अवतारच धर्मसंरक्षणार्थ असल्यामुळें त्यानें स्वत: विघ्न दूर करण्याचें त्यांना वचन दिलें. तेव्हां ते मुनि म्हणाले, रामचंद्रा, लवण हा

---

* त्राणाभावे हि शापास्त्राः कुर्वन्ति तपसो व्ययम्।

असा तसा नसून स्वतःजवळील शूलामुळें दुर्जय झाला आहे. यास्तव तो शूलविरहित असेल तेव्हांच त्याच्यावर चाल करून त्याचा वध करतां येईल. हें त्यांचें भाषण ऐकून या कामीं शत्रुघ्नच योग्य आहे असें जाणून रामचंद्रानें त्याचीच या कार्यावर योजना केली. शत्रूचा नायनाट करून आपलें नांव अन्वर्थक करण्याची ही योग्य संधीच त्यास रामचंद्रानें दिली. सामान्य नियमाचा बाध करावयाला एकहि अपवाद समर्थ असतो,* तसा रघुकुलांतील कोणताहि पुरुष शत्रूचें उच्चाटण करण्यास पूर्ण समर्थ होता.

असो. रामचंद्राचा आशीर्वाद घेऊन शत्रुघ्न निर्भयपणें निघाला. त्याला साह्य करण्यासाठीं त्याच्या मागून सेना येत होती खरी, परंतु ती केवळ शोभेखातर होती असें म्हटलें तरी चालेल. त्याला वाट दाखविण्यासाठीं मुनीहि पुढें चालले होते. मार्गांत त्यांची वस्ती वाल्मीकींच्या आश्रमांत झाली. तेथें वाल्मकीनें आपल्या तपःसामर्थ्यानें शत्रुघ्नाचा व त्याच्या श्रान्त झालेल्या सेनेचा यथोचित सत्कार केला.

त्याच रात्रीं सीता प्रसूत होऊन तिला दोन पुत्र झाले. आपल्या वडील बंधूस अपत्य झालेलें पाहून शत्रुघ्नाला आनंद वाटला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं वाल्मीकींची आज्ञा घेऊन तो पुढें चालूं लागला. लवणाच्या मधुपघ्न नांवाच्या पुरीस तो पोहोंचतो आहे तोंच वनांतून मारलेले पशू घेऊन परत आलेला लवण राक्षस त्याला दिसला.

लवणासुराचा वर्ण काळाकुट्ट होता. त्याच्या अंगाला वसेची घाण येत होती. त्याचे केस अग्निज्वाळेप्रमाणें पिंगट होते. त्याच्या भोंवतीं मांसभक्षक पशूंचा घोळका होता; आणि तो चालत असतांना जणूं काय चिताग्नीच चालला आहे असें वाटत होतें. त्याला पाहतांच

---

* अपवाद इवोत्सर्गं व्यावर्तयितुमीश्वरः ।

हा शूलविरहित आहे असें जाणून शत्रुघ्नानें त्याच्यावर चाल केली. शत्रूचें छिद्र पाहून प्रहार केला असतां जय हा ठेवलेलाच असतो. *

लवणासुरानेंहि शत्रुघ्नाला अवलोकन करतांच, ' बरें झालें. तुझी देवानें येथें योजना केली. आज मृगया करून आणलेले पशू माझ्या पोटाच्या खांचेला पुरेसे नव्हते, ' अशी धमकी देत त्याला मारण्यासाठीं, मूठभर गवत उपटावें तसें, उंचसें झाड उपटून तें शत्रुघ्नावर फेकिलें; पण शत्रुघ्नाच्या बाणानें वाटेंतच त्याचे तुकडे तुकडे झाले; त्या झाडाच्या फुलांतील रज:कण मात्र त्याच्या अंगापर्यंत जाऊन पोंचले. झाडाचे तुकडे झालेले पाहून लवणानें, जणूं काय कृतान्ताच्या मुष्टीएवढी एक मोठी थोरली धोंड त्याच्यावर फेंकिली; पण शत्रुघ्नानें इंद्रास्त्र फेकून तिचे वाळूसारखे कण केले.

मग लवण उजव्या हाताची मूठ वळून त्याच्यावर धावला; इतक्यांत शत्रुघ्नानें विष्णूपासून प्राप्त झालेला दिव्य बाण त्याच्यावर सोडला. त्याबरोबर हृदय फुटून लवण जमिनीवर आदळला; तेव्हां भूमिकंप झाला, पण मुनिजनांचा कंप मात्र दूर झाला !

लवण पडल्यानंतर त्याच्या प्रेतावर गृध्रादि पक्ष्यांनीं झडप घातली. पण त्याच्या प्रतिस्पर्ध्यावर दिव्यकुसुमांचा वर्षाव झाला ! अशा प्रकारें आपल्या हातून लवणासुराचा वध झालेला पाहून, इंद्रजिताचा वध करणाऱ्या लक्ष्मणाचे आपण खरे भाऊ शोभतों असें शत्रुघ्नास वाटलें.

याप्रमाणें लवणास नामशेष करून शत्रुघ्नानें त्या देशास निर्भय केलें; आणि तेथें यमुनातीरीं +मथुरानामक सुंदर नगरी वसविली. शत्रुघ्नाच्या कृपाछत्राखालीं त्या नगरींतील लोकांचा उत्कर्ष झाला. स्वर्गांतील लोकांनींच भूतलावर येऊन ती वसविली कीं काय असें वाटूं लागलें !

---

*—संमुखीनो हि जयो रन्ध्रप्रहारिणाम् । + मधुपुरी–मधुनामक राक्षसाची पुरी. ' मधुपुरी ' शब्दाचा अपभ्रंश होऊन ' मथुरा ' असें नांव पडलें.

# कथा पंचविसावी

## गेलेला प्राण परत आला !



मंत्रकर्ते भगवान वाल्मीकि ऋषि जसे दशरथाचे तसे जनकाचेहि परम स्नेही होते. त्या दोघांचेंहि प्रेम लक्षांत घेऊन त्यांनीं सीतेच्या जुळ्या मुलांचे योग्य ते जातसंस्कार केले आणि त्यांचीं कुश व लव अशीं नांवें ठेविलीं. ते थोडेसे जाणते झाल्यावर त्यांनीं त्यांच्याकडून सांग वेदांचें अध्ययन करविलें आणि आपण रचिलेलें आद्य काव्यहि त्यांना गावयास शिकविलें. त्या काव्यांत रामाची मधुर कथा वर्णिलेली होती. मातेपुढें बसून ते काव्य गाऊं लागले म्हणजे त्याच्या श्रवणानें सीतेचें पतिविरहदुःख किंचित् हलकें होई.

इकडे रामाच्या इतर बंधूंनाहि प्रत्येकीं दोन दोन पुत्र झाले. शत्रुघ्नाच्या पुत्रांचीं नांवें सुबाहु व शत्रुघाती अशीं होतीं. ते मोठे झाल्यावर शत्रुघ्नाला रामाची भेट घेण्याची इच्छा झाली. म्हणून त्या मुलांवर मथुरेचा व विदिशेचा कारभार सोंपवून तो अयोध्येस आला. वाल्मीकींच्या तपांत व्यत्यय येईल म्हणून तो या वेळीं वाटेंत त्यांच्या आश्रमांत थांबला नाहीं.

अयोध्येस आल्यावर त्याचा सर्वांकडून चांगला गौरव झाला. रामानेंहि त्याचें अभिनंदन केलें; व त्याला सर्व ठिकाणचें वृत्त विचारिलें. शत्रुघ्नानें कुशलवांच्या जन्माची कथा वगळून सर्व गोष्टी त्याला यथाक्रम सांगितल्या. कुशलवांचें वृत्त वगळण्याचें कारण, शत्रुघ्नास वाल्मीकींची तशी आज्ञा होती. ते स्वतःच योग्य काळीं त्या मुलांना रामाच्या स्वाधीन करणार होते.

पुढें एके दिवशीं एक ब्राह्मण आपल्या मृत बालकास घेऊन अयोध्येस आला आणि राजवाड्याच्या द्वारापाशीं येऊन, राजाला हांक मारून शोक करूं लागला:—'हे माते पृथ्वि, काय ही तुझी शोचनीय अवस्था! दशरथ गेल्यावर तूं रामाच्या हातीं सांपडलीस व त्यामुळें तुझी उत्तरोत्तर अधिकाधिक कष्टमय स्थिति होत गेली आहे.' ब्राह्मणाचा आक्रोश ऐकून रामास लज्जा वाटली; कारण इक्ष्वाकु राजांच्या देशांत अकालीं मृत्यु कोणास ठाऊक नव्हता. त्यानें त्या दु:खी ब्राह्मणाचें समाधान करून त्यास क्षणभर थांबावयास सांगितलें आणि मृत्यूला जिंकण्यासाठीं निघावें म्हणून पुष्पक विमानाचें स्मरण केलें.

विमान येतांच राम सशस्त्र होऊन त्यांत बसला व विमान चालूं लागणार तोंच "हे राजा, तुझ्या प्रजेपैकीं कोणीतरी अधर्म केला आहे तो शोधून काढून त्याचें निराकरण कर म्हणजे तूं कृतकृत्य होशील" अशी आकाशवाणी झाली.

ती ऐकून अनाचार कोठें होत आहे तो शोधून काढावा म्हणून राम इतस्तत: हिंडूं लागला. तेव्हां एके ठिकाणीं एक पुरुष स्वत:स झाडाला उलटें टांगून घेऊन धूमपानाची तपश्चर्या करीत आहे असें त्याला आढळलें. त्याचे डोळे धुरानें लालबुंद झाले होते. नांव विचारतां 'माझें नांव शंबूक, मी शूद्र आहें व स्वर्गप्राप्तीसाठीं तप करीत आहें' असें त्यानें उत्तर दिलें. तेव्हां अधिकार नसतां तपश्चरणाचें पातक केल्यामुळें हा शीर्षच्छेदाच्या शिक्षेला पात्र आहे असें ठरवून रामानें शस्त्र उपसलें व त्याचें शिर धडापासून वेगळें केलें. स्वत: रामानेंच त्याला दंड केल्यामुळें तो तपस्वी सद्गतीला गेला. तो वर्णधर्माचें उल्लंघन करीत असल्यामुळें त्या दुश्चर तपश्चरणानेंहि त्यास तशी गति मिळाली नसती.

आतां अयोध्येस परत जावें म्हणून राम निघणार तों वाटेंतच त्यास अगस्तिमुनींचें दर्शन झालें. त्या वेळीं त्यांनीं त्यास एक दिव्य कंकण अर्पण केलें. अगस्तिमुनींनीं पूर्वी समुद्राचें प्राशन करून त्याला मुक्त केल्यामुळें समुद्रानें संतुष्ट होऊन त्यांना जें कंकण दिलें होतें तेंच हें कंकण होय. त्याचा भक्तिपुरःसर स्वीकार करून राम अयोध्येस परत आला. तत्पूर्वींच ब्राह्मणपुत्राचे प्राण त्याच्या कुडींत परत आले होते.

रामप्रभु प्रत्यक्ष कृतान्तापासूनहि प्रजेचें परित्राण करण्यास समर्थ आहे, असा प्रत्यय पुत्रसमागम झाल्यानें ब्राह्मणास आला व त्यानें पूर्वीच्या रामनिंदेची फेड आतां त्याची स्तुति करून केली.

---

वनस्थळांतील वृक्षांवरून दंवाचे बिंदु गळावे, तसे सर्वांच्या डोळ्यांतून अश्रुबिंदु गळूं लागले ! वय व वेष वगळतां, राम व हे मुलगे यांमध्यें अपूर्व सादृश्य दिसून आल्यामुळें सारे लोक त्यांच्याकडे टकमक पाहूं लागले. त्यांच्या नेत्रांची तृप्ति म्हणून होईना.

मग रामानें संतुष्ट होऊन कौतुकानें व प्रेमानें त्यांना मोठें पारितोषिक घेण्यास सांगितलें. परंतु 'आम्हांला हें घेऊन काय करावयाचें आहे ?' असें म्हणून त्यांनीं तें नाकारलेलें पाहून या त्यांच्या निःस्पृहतेविषयीं लोकांना जितकें आश्चर्य वाटलें, तितकें त्यांच्या गाननैपुण्याबद्दलहि वाटलें नव्हतें. तें काव्य कोणीं केलें हें जाणण्याची इच्छा उत्पन्न होऊन रामानें त्यांना विचारिलें,

'मुलांनो, तुम्हांला गायन शिकविणारा गुरु कोण व हें काव्य कोणीं रचिलें आहे ?' त्यांनीं उत्तर केलें 'भगवान वाल्मीकि हे आमचे गुरुजी; त्यांनींच हें काव्य रचिलें आहे.'

तें ऐकून राम बंधूंसहवर्तमान वाल्मीकींकडे गेला आणि त्यानें त्यांस सर्व राज्य समर्पण केलें. त्या वेळीं परमदयाळू असे वाल्मीकि मुनि म्हणाले—

'रामचंद्रा, सीतेपासून झालेले हे तुझेच पुत्र होत. आतां यांसह सीतेचा स्वीकार कर.' रामचंद्रानें उत्तर केलें—

"महाराज, या तुमच्या सुनेची अग्निद्वारा आम्ही समक्ष शुद्धि केली असतांहि, येथील लोकांचा तिच्यावर विश्वास बसला नाहीं. तरी आतां आपलें शुद्ध चारित्र्य सर्व जनतेला पटवून देण्यासाठीं सीतेनें दिव्य करावें म्हणजे मी आपल्या आज्ञेनुसार पुत्रांसह हिचा स्वीकार करीन."

रामानें असें आश्वासन दिल्यावर वाल्मीकींनीं आपल्या शिष्याकरवीं सीतेला व तिच्या पुत्रांना आपल्या आश्रमाहून आणविलें. दुसऱ्या दिवशीं

नागरिकांची सभा भरवून काय तो विधि होऊं द्या अशी रामानें वाल्मीकींस विनंती केली. त्याप्रमाणें दोन्ही पुत्र व सीता यांसह वाल्मीकि तेथें आले.

सीतेनें काषाय वस्त्रें परिधान केलीं होतीं व आपल्या पायांकडेच दृष्टि लावून ती पाहात होती. तिचें शरीर जणूं शांतरसाची मूर्ति दिसत होतें. त्यामुळें तिला पाहतांच तिच्या शुद्धाचरणाची साक्ष सर्वांना मनोमय पटली. त्यांनीं तिच्यावरून दृष्टि काढिली आणि खालीं मान घालून ते स्तब्ध राहिले. तेव्हां रामासमोर आसनावर बसलेले वाल्मीकि सीतेस म्हणाले,

'मुली, आतां आपल्या शुद्धाचरणाविषयीं लोकांचा संशय दूर कर.'

मग वाल्मीकिशिष्यानें आणून दिलेल्या पवित्र जलाचें सीतेनें आचमन केलें आणि ती म्हणाली,

'हे देवि भूमाते, जर मी वाचेनें, मनानें किंवा कृतीनें कोणत्याहि प्रकारें पतीचा अपराध केला नसेल तर मजवर कृपा कर आणि आपल्या पोटांत मला आसरा दे.'

सीतेच्या मुखांतून हे शब्द निघतांक्षणींच पृथ्वी एकदम दुभंगली व तींतून विजेच्या ज्योतीसारखें एक प्रभामंडळ वर आलें. त्यांत नागफणांवरील सिंहासनावर साक्षात् भूदेवी बसली होती. तिनें सीतेला आपल्या मांडीवर घेतलें आणि सीतेनें पतीवर दृष्टि लाविली असतां, व 'जाऊं नको, थांब थांब' असें राम मोठ्यानें म्हणत असतां, ती पाताळांत प्रविष्ट झाली !!

पृथ्वीनें सीतेला पाताळीं नेलें हें पाहून राम क्रोधानें लाल झाला व 'माझी दयिता मला दे, नाहींतर हे वसुंधरे मी तुझा नाश करीन' असें म्हणून त्यानें धनुष्य सज्ज केलें; पण 'विधिनियोग बलवत्तर आहे, तो टळत नाहीं' अशी समजूत घालून गुरु वसिष्ठांनीं त्याचा कोप शान्त केला.

---

# कथा सत्ताविसावी

## महाप्रस्थान



यज्ञसमाप्तीनंतर सर्व पाहुणे मंडळींना आदरपूर्वक निरोप देऊन रामचंद्रानें त्यांची आपापल्या घरीं पाठवणी केली आणि सीतेविषयींचें प्रेम तो तिच्या मुलांवरच दाखवूं लागला. भरताचा मामा जो युधाजित त्याच्या सांगण्यावरून रामानें सिंधुदेश भरताला दिला. तो प्रदेश सिंधुनदीच्या दोन्ही कांठाला असून गंधर्व तो बळकावून बसले होते. भरतानें त्यांचा पाडाव करून त्यांच्याकडून शस्त्रसंन्यास करविला आणि त्यांना वीणा घेऊन गावयास लाविलें.

मग आपले पुत्र तक्ष व पुष्कल यांना त्या ठिकाणीं राज्याभिषेक करून भरत पुनः रामाकडे आला. लक्ष्मणानेंहि रामाच्या आज्ञेवरून कारापथ देशाचें आधिपत्य आपले मुलगे चंद्रकेतु व अंगद यांस दिलें.

याप्रमाणें आपापल्या मुलांची नीट व्यवस्था लाविल्यावर चौघांहि बंधूंनीं मृत मातांना तिलांजलि दिली.

एके दिवशीं मुनीचा वेष घेऊन प्रत्यक्ष काळ रामचंद्राच्या भेटीस आला व म्हणाला,

"रामा, तूं व मी यांशिवाय तिसऱ्या कोणीं आपलें भाषण ऐकतां कामा नये; ऐकल्यास त्यास देहान्त प्रायश्चित्त दे.'

'ठीक आहे' असें म्हणून रामानें लक्ष्मणास तशी आज्ञा करून दरवाजावर बसविलें. तेव्हां तो मुनि म्हणाला,

'मी यम; ब्रह्मदेवाची आज्ञा आपणांस कळविण्याकरितां आलों आहें;

आपलें अवतारकार्य संपूर्ण झालें असून आतां आपण स्वर्गलोकीं निघून यावें.'

इतक्यांत रामचंद्राला भेटण्याकरितां बाहेर दुर्वास ऋषि आले. त्यांचा खोळंबा केल्यास ते शाप देतील अशी भीति वाटून, मुनि व राम यांचा संकेत ठाऊक असतांहि लक्ष्मणानें त्यांच्या एकांताचा भंग केला आणि वडील बंधूची प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठीं शरयूतीरीं जाऊन योगमार्गानें देहत्याग केला.

आपल्यापैकीं एक बंधु नाहींसा झालेला पाहून रामाला आपण त्रिपाद झालेल्या धर्माप्रमाणें शिथिल झालों आहों असें वाटूं लागलें. म्हणून कुशाची कुशावती नगरीमध्यें आणि लवाची शरावती नगरीमध्यें स्थापना करून, उरलेल्या दोन बंधूंसह, अग्नि पुढें करून त्यानें उत्तरेची वाट धरिली. त्या वेळीं स्थावर वाडे वगळून सारी अयोध्या राजप्रेमामुळें त्याच्या मागोमाग चालूं लागली. रामाचें मनोगत ओळखून वानर व राक्षसहि त्याच्या पाठोपाठ निघाले. अयोध्यावासी अफाट जनसमूहाच्या नेत्रांतून कदंबवृक्षाच्या कळ्यांएवढे अश्रु टप् टप् पडून सर्व रस्ता भिजून गेला !

सर्व जण शरयूच्या तीर्थावर येऊन पोंचले, तों आकाशांत दिव्य विमान दिसूं लागलें. तें खालीं आल्यावर राम त्यांत बसला व आपल्या मागून येणाऱ्या सर्वांसाठीं त्यानें शरयूलाच स्वर्गारोहणाचें सोपान केलें. त्या ठिकाणीं पाण्यांत बुड्या मारण्याची अयोध्यावासी जनांची उत्कंठा काय वर्णावी ! गुरें पाणवठ्यावर उतरतांना जशीं एकमेकांचे अंगास अंग घाशीत पुढें घुसतात तसे ते एकमेकांत रेटारेटी करीत शरयूंत उतरले. तेव्हांपासून त्या पावन तीर्थाला गोप्रतर असें नांव मिळालें.

---

* गोप्रतर—पाणवठ्यावर उतरतांना होणारी गुरांची गर्दी.

याप्रमाणें भगवान् विष्णूनें रामरूपानें अवतार घेऊन व दशमुखाचा शिरश्छेद करून देवांचें कार्य पार पाडिलें; आणि आपल्या कीर्तीचे जणूं स्मारकस्तंभ म्हणून बिभीषण व मारुति यांची दक्षिण व उत्तर पर्वतांवर स्थापना करून तो आपल्या मूळ स्वरूपांत विलीन झाला! सुग्रीवादि वानर हे देवांचे अंशभूत असल्यानें त्यांनीं आपापलीं पूर्वस्वरूपें धारण केलीं आणि ब्रह्मदेवानें रामाच्या इतर अनुयायांकरितां एक निराळाच स्वर्गलोक निर्माण केला!

---

# कथा अठ्ठाविसावी

## ओसाड नगरी



भगवान विष्णूचे अंशभूत असे जे रामादि चार बंधु त्यांना प्रत्येकीं दोन दोन मिळून आठ पुत्र होऊन त्यांचा वंशविस्तार झाला. त्यांत वयानें व गुणानें कुश हा सर्वांत ज्येष्ठ व श्रेष्ठ असल्यामुळें इतर सातांनीं त्यालाच अग्रपद दिलें व ते सगळे जण आपापलीं राज्यें सांभाळून वडिलांनीं घालून दिलेल्या रीतीप्रमाणें गुण्यागोविंदानें राहूं लागले. त्यांनीं आपापल्या राज्यांत नद्यांवर पूल बांधिले व कृषिगोरक्षादिकांना उत्तेजन दिलें; वन्यगजांचा संग्रह केला आणि इतरहि अनेक सुखसोई करून राज्याची भरभराट केली.

एकदां मध्यरात्रींच्या सुमारास कुश एकाएकीं जागा झाला. त्याच्या मंदिरांतील दिवे अगदीं मंदमंद जळत होते. इतर सर्व मंडळी गाढ झोपीं गेली होती. अशा स्थितींत प्रोषितभर्तृकेचा वेष केलेली एक स्त्री आपल्यापुढें उभी आहे असें त्याला दिसलें. तिला कुशानें पूर्वीं कधींहि पाहिलें नव्हतें. तिनें त्याचा जयजयकार करून त्याच्यापुढें हात जोडिले, आणि दरवाजाचे सगळे अडसर लाविलेले असतांहि, प्रतिबिंब आरशांत शिरावें त्याप्रमाणें, शयनागारांत प्रविष्ट झालेल्या त्या स्त्रीला पाहून कुशाला मोठा अचंबा वाटला. तो आपल्या शय्येवर उठून बसला व तिला म्हणाला—

हे शुभे, तूं कोण आहेस? सर्व द्वारें बंद असतांना तूं येथें आलीस खरी पण तुझ्या ठिकाणीं कांहीं योगसामर्थ्य असावेंसें दिसत नाहीं. थंडीनें कोमेजून गेलेल्या कमलिनीप्रमाणें तूं मला दिसत आहेस. तूं कोण व कोणाची स्त्री? आणि माझ्याकडे येण्याचें प्रयोजन काय? रघुकुलांतील

राजे परस्त्रीविमुख असतात ही गोष्ट लक्षांत ठेवून काय सांगावयाचें असेल तें सांग.'

कुशाचा प्रश्न ऐकून त्या स्त्रीनें उत्तर केलें,

'राजा, तुझ्या पित्यानें स्वर्गलोकीं प्रयाण करतांना ज्या पुरींतील लोकांना आपणांबरोबर नेलें त्या अयोध्यापुरीची अनाथ झालेली मी अधिदेवता आहें. रामराज्यांत माझ्या वैभवाची सर अलकापुरीलाहि येत नसे. पण सांप्रत तूं आपली सर्व शक्ति वेंचित असूनहि, माझ्या प्रभूच्या वियोगामुळें माझी अवस्था करुणाजनक झाली आहे. सूर्य अस्तास गेल्यावर, सोसाट्याच्या वाऱ्यानें मेघ इतस्ततः फाकून गेले असतां संध्या-समय जसा अंधकारमय दिसतो, तसें माझें हें विस्तीर्ण निवासस्थान, आंतील सारीं घरें उध्वस्त झाल्यामुळें ओसाड पडलें आहे.

पूर्वी ज्या ठिकाणीं रात्रौ मंजुळ नूपुरें पायांत घालून अभिसारिका संचार करीत असत त्या राजमार्गांतून आतां कर्कश ओरडणाऱ्या भालू येरझाऱ्या करीत आहेत. ज्या विहिरींत क्रीडा करणाऱ्या स्त्रियांच्या हस्ता-घातामुळें मृदंगासारखा गंभीर ध्वनि होत असे त्याच विहिरींत आतां रानांतील रेडे शिरून त्यांच्या शिंगांच्या आघातामुळें खळखळ शब्द होत आहे. मोरांचे बसावयाचे खांब मोडून गेल्यामुळें ते झाडावरच बसत आहेत. मृदंगाचा ध्वनि कोठें होत नसल्यामुळें मोरांचें नाचणें बंद पडलें आहे. क्रीडामयूरांचे पिसारे वणव्यांतून उडालेल्या ठिणग्यांनीं जळून गेल्या-मुळें क्रीडामयूर हे रानमयूरच बनले आहेत. ज्या माझ्या घरांतील सोपा-नांवर अळित्यांनीं रंगविलेलीं केवळ सुंदर स्त्रियांचीं पावलें पडत असत तेथें आतां हरणांच्या रक्तानें माखलेले वाघांचे पंजे पडत आहेत !

कमलवनांत हत्ती क्रीडा करीत आहेत व हत्तिणी त्यांच्या मुखांत कमळांचे देठ घालीत आहेत अशा भिंतीवरील चित्रावर प्रेक्षकांच्या

नखांचे आघात होऊन हत्तींच्या गंडस्थळाचे भाग फुटून गेल्यामुळें सिंहानें प्रहार करून ते जणूं काय फोडून टाकिले आहेत असे दिसतात. मोत्यांच्या हारांसारखे स्वच्छ चंद्रकिरण प्रासादावर पडून आतां पूर्ववत् परावर्तन पावत नाहींत; कारण त्या ठिकाणीं सांप्रत गवत वाढलेलें आहे. माझ्या उद्यानांतील वेलींचीं पुष्पें विलासी स्त्रिया आपल्या कोमल हातांनीं तोडीत असत. त्याच माझ्या वेली आतां वानर उध्वस्त करून टाकीत आहेत. घरांच्या खिडक्यांतून आतां रात्रींचे दिवे चमकत नाहींत; त्यांतून कोठें धूरहि निघतांना दिसत नाहीं; कोळ्यांच्या जाळ्यांनीं त्या भरून गेल्या आहेत.

शरयूच्या घाटावर ठिकठिकाणीं देवपूजन चाललेलें असे व स्नानासाठीं लोकांचे थवेच्या थवे जमत असत; तेथें आतां त्यांचा शुकशुकाट झालेला पाहून माझें मन कसेंसेंच होतें.

राजा, तुझ्या पित्यानें कारणपरत्वें धारण केलेलें मनुष्यरूप सोडून पुनः आपलें परमात्मरूप घेतलें; तूंहि तसेंच कर म्हणजे ही कुशावती नगरी सोडून तुझी कुलपरंपरागत राजधानी जी अयोध्या तिजकडे परत ये.

तिची ही विनंती ऐकून कुश संतुष्ट झाला आणि ‘ ठीक आहे, तसें करितों ’ असें म्हणाला. अयोध्यादेवताहि प्रसन्नमुख होऊन तेथेंच अन्तर्धान पावली.

दुसऱ्या दिवशीं कुशानें रात्रौ घडलेलें अद्भुत वृत्त राजसभेंत ब्राह्मणांना निवेदन केलें. ब्राह्मणांनीं तें ऐकून प्रत्यक्ष कुलराजधानीच्या देवतेनेंच कुशाला अधिपति म्हणून मान्यता दिल्याबद्दल त्याचें अभिनंदन केलें.

नंतर कुशावती नगरी श्रोत्रिय ब्राह्मणांच्या स्वाधीन करून कुश एका शुभ दिवशीं ससैन्य अयोध्येस जावयाला निघाला. वाटेनें त्याचें सैन्य

म्हणजे एक फिरती राजधानीच होती. पताकांच्या रांगा हीं त्यांतील उपवनें; हत्ती हेच त्यांतील क्रीडापर्वत व रथ म्हणजे विस्तीर्ण घरें होतीं.

चंद्रोदय झाला म्हणजे समुद्र उचंबळून तीराकडे धाव घेतो त्याप्रमाणें कुशाचा सेनासागर त्याच्या पाठोपाठ आपल्या पूर्वनिवासाकडे चालला होता. उत्सुकतेनें चालणाऱ्या सैनिकांच्या पायांच्या धुळीचा त्रास सहन न होऊन कीं काय, वसुंधरेनें धूळीच्या रूपानें विष्णूच्या द्वितीय पदाचा म्हणजे आकाशाचा आश्रय केला ! हत्तींच्या गंडस्थळांतून वाहणाऱ्या मदोदकाच्या वर्षावामुळें रस्त्यांतील धुळीचा चिखल बने आणि अश्वांनीं खुरांनीं तुडविल्यामुळें चिखलाची पुनः धूळ होई.

याप्रमाणें विंध्यपर्वतांतून वाट काढीत काढीत निरनिराळ्या मार्गांनीं त्याची सेना चालली असतां, तिच्या शब्दाचा नर्मदेच्या खळखळाटासारखा प्रतिध्वनि पर्वताच्या गुहांतून निघे. तेथें मार्गांत विंध्याद्रींतील किरातांनीं त्यास पुष्कळ उपायनें आणून दिलीं.

अशा प्रकारें कित्येक दिवस वाट चालल्यावर गंगानदीला वंदनपूर्वक ओलांडून कुश शरयूनदीच्या कांठीं आला. तेथें त्याला आपल्या पूर्वजांनीं उभारलेले शेंकडो यज्ञस्तंभ दृष्टीस पडले. तेथील उपवनावरून वाहणारा शीतल वायु त्याला सामोरा आला व क्लान्त झालेल्या सैन्याला त्यानें आनंदित केलें.

मग त्या लोकप्रिय कुश राजानें वाडे वगैरे बांधण्यासाठीं सहस्रावधि शिल्प्यांची योजना केली व त्यांना साधनसामग्री व मालमसाला भरपूर पुरविल्यामुळें, उन्हाळ्यांत कोरड्या होऊन गेलेल्या भूमीला मेघ जलवर्षावानें जसे टवटवीत करतात तसें त्यांनीं त्या ओसाड स्थितींत असलेल्या अयोध्येलाहि थोडक्याच काळांत भरगच्च व सुंदर स्वरूप आणून दिलें.

# कथा एकोणतिसावी

## हरवलेलें कंकण

——:०:——

ग्रीष्म ऋतूस प्रारंभ झाला. हा ऋतु म्हणजे शीतलोपचार कसे करावे हें शिकविणारा गुरूच होय. दक्षिण दिशा सोडून सविता समीप आला तेव्हां उत्तरदिशेला जणूं आनंद होऊन ती वितळूं लागलेल्या हिमाच्या रूपानें आनंदाश्रु गाळूं लागली! दिवस अत्यंत तापयुक्त झाला, व रात्र नितान्त कृश झाली! जणूं काय दोघांचा प्रणयकलह होऊन दोन्ही पश्चात्ताप करीत आहेत असें वाटे! रानामध्यें सायंकाळीं फुलणाऱ्या मोगरींच्या सुगंधी कळ्यांवर गुंजारव करीत फिरणारे भ्रमर जणूं कळ्यांची संख्याच मोजूं लागले. कारंजांतून उडणाऱ्या चंदनयुक्त शीतल जलानें वेष्टिलेल्या शिलांवर श्रीमान लोक बसून उष्णतेचा ताप दूर करूं लागले.

त्या दु:सह अशा उष्ण कालांत तो उदयशाली नृपति व उदयशाली निशापति हे दोघेहि लोकांना विशेष प्रिय झाले; कारण दोघांचेंहि पादसेवन केल्यानें तापाचें निवारण होई. या ऋतूंत जलावगाहन सर्वांनाच सुखकर होतें. कुशराजालाहि शरयूजलांत विहार करण्याची इच्छा झाली. त्यानें तटावर तंबू ठोकविले, धीवरांकडून नक्रादि प्राणी घालवून दिले आणि मग तो उदकामध्यें उतरला. त्याच्या अंगना घाटावरून खालीं उतरल्या असतां, एकमेकींच्या हातांतील केयूर व पायांतील नूपुर हे एकमेकांवर आदळल्यामुळें नदींतील हंस भयभीत होऊन त्यांची गडबड उडाली. पाण्यांत गेल्यावर त्या अंगना परस्परांवर पाणी उडवूं लागल्या.

कुश विहारनौकेंत बसून त्यांची मजा पाहात होता. त्याच्याजवळ बसून एक कोळीण चवरी वारीत होती, तिला तो म्हणाला—

'पाहा या प्रवाहाची मौज! या स्त्रिया आंत डुंबत असल्यामुळें त्यांच्या उटीचा रंग पाण्यांत मिसळून हा प्रवाह संध्याकालीन अभ्रयुक्त आकाशा-सारखा झाला आहे. पाण्यांत पडून वाहणाऱ्या स्त्रियांच्या कर्णावरील शिरीषपुष्पांवर तीं शेवाळें आहेत असें समजून मासे तुटून पडत आहेत. स्त्रिया जलविहार करतांना गात गात दोन्ही हातांनीं पाण्यावर आघात करून मृदंगासारखा ध्वनि काढीत आहेत; तो ऐकून तीरावरील मोर आपले पिसारे उभारून आपल्या मधुर केकांनीं त्यांची जणूं प्रशंसा करींत आहेत.'

याप्रमाणें स्त्रियांच्या जलक्रीडेची गंमत पाहून कुश स्वतःहि नावेंतून खालीं पाण्यांत उतरला व विहार करूं लागला. त्याच्यावर स्त्रिया सोन्याच्या पिचकारींतून रंगीत पाणी उडवूं लागल्या. असा त्यांचा खेळ चालला असतां, कुशाच्या हातांतील विजयशाली कंकण नकळत निसटून पाण्यांत पडलें आणि तळाशीं गेलें; हें कंकण पूर्वी रामाला अगस्ति मुनीकडून प्राप्त झालें होतें व तें त्यानें कुशाला राज्यारोहणप्रसंगीं दिलें होतें.

यथेष्ट स्नान केल्यावर कुश तीरावर आला तेव्हां हातांत वलय नसल्या-कारणानें त्याला तो ओकासा दिसला. कुश अलंकाराचा लोभी होता असें नाहीं, पण हें कंकण म्हणजे जयश्रीला वश करण्याचें साधन असून, त्याच्या पित्यानेंहि तें धारण केलें होतें, म्हणून तें नष्ट झाल्यामुळें त्याला हुरहुर लागली. खरें पाहिलें तर त्याच्यासारख्या ज्ञानी पुरुषांना भूषणाची योग्यता फुला-पेक्षां अधिक वाटत नाहीं.

त्यानें लगेच बुड्या मारण्यांत कुशल अशा धीवरांना तें शोधून काढावयाची आज्ञा केली. त्याप्रमाणें पाणबुड्यांनीं पाण्यांत पुष्कळ बुड्या

मारून पाहिल्या, पण व्यर्थ. शेवटीं ते निराश झाले आणि वर येऊन खिन्न मुखानें कुशास म्हणाले—

'महाराज, आपलें दिव्य कंकण आम्ही पुष्कळ प्रयत्न केला पण आम्हांस गवसलें नाहीं. या शरयूच्या डोहांत कुमुद नांवाचा एक नाग राहात आहे. तो अशा अलंकाराचा लोभी आहे, त्यानें तें बहुधा नेलें असावें.'

हें ऐकून कुशानें कुमुद नागाचा नाश करण्याचा विचार केला आणि वेगानें तीरावर जाऊन गरुडास्त्रयुक्त तीर त्याच्यावर सोडला.

कुशाचा तीर पाण्यांत शिरल्याबरोबर तो डोह एकदम क्षुब्ध झाला आणि रानहत्तीप्रमाणें शब्द करूं लागला. सागराचें मंथन होत असतांना जसे त्यांतील नक्रादि प्राणी संक्षुब्ध झाले तशी त्या डोहाची स्थिति होऊन त्यांतून भुजंगराज कुमुद आपल्या भगिनीला घेऊन अकस्मात् वर आला. आपलें कंकण घेऊन भेटीस आलेल्या कुमुदाला पाहतांच कुशानें गरुडास्त्र आवरून घेतलें. विनम्र झालेल्यावर रोष न करणें हा सज्जनांचा धर्मच आहे.*

मग कुशाला साष्टांग प्रणिपात करून कुमुद म्हणाला—

'हे राजा, परंपरेनें तूं विष्णूचा अवतार आहेस. तुझी अवज्ञा करून मी तुझा रोष कसा ओढून घेईन? ही मुलगी कंदुकक्रीडा करीत असतां तिच्या हातांतील कंदुक उडाला व त्याच्याकडे वर मान करून ती पाहात असतां, अंतरिक्षांतून खालीं पडणाऱ्या ज्योतीप्रमाणें या डोहांतून खालीं येणारें हें तुझें दिव्य कंकण तिनें चटकन झेललें. तरी तें आतां पृथ्वीचें रक्षण करणाऱ्या तुझ्या विशालबाहूला पुनः अलंकृत करो. ही माझी

---

* प्रह्वेष्वनिर्बंधरुषो हि सन्तः ।

धाकटी बहीण कुमुद्वती; हिच्या मनांतून तुझ्या चरणांची निरंतर सेवा करावी व तेणेंकरून आपल्या अपराधाचें निराकरण करावें असें आहे; तरी या गोष्टीला कृपा करून तूं अनुमति दे. असें म्हणून कुमुदानें तें दिव्य-कंकण व आपल्या कुलाचें भूषण अशी ती भगिनी कुशाला विधिवत् अर्पण केली, आणि 'तुझ्यासारख्या थोर पुरुषाशीं झालेल्या ह्या संबंधामुळें मी धन्य झालों आहें' असें म्हटलें.

कुमुद व कुश यांचा अशा रीतीनें संबंध घडून आल्यामुळें नागजातीला गरुडाचें भय नाहींसें झालें. कारण कुश हा विष्णूचा अंश होता आणि गरुड हें विष्णूचें वाहन. त्याचप्रमाणें कुशाच्या राज्यालाहि नागांची भीति वाटेनाशी झाली.

---

# कथा तिसावी

## राजनीतीचा आदर्श

—••०••—

कुशराजाला कुमुद्वतीपासून अतिथि नांवाचा पुत्र झाला. त्यानें आपल्या अनुपम तेजानें पितृवंश व मातृवंश या दोघांचाहि उद्धार केला. राजनीतिनिपुण अशा कुशानें त्याला प्रथम परंपरागत विद्येचें शिक्षण दिलें आणि तो वयांत आल्यावर त्याचा विवाह करून दिला. आपल्या सारखाच कुलीन, पराक्रमी व सद्गुणी पुत्र पाहून हा आपला दुसरा अवतारच होय असें कुशाला वाटे.

आपल्या कुलपरंपरेस अनुसरून एकदां कुश इंद्राला साह्य करावयास गेला असतां युद्धांत त्यानें एका दुर्जय नामक दुर्जय दैत्याचा वध केला आणि तो स्वतःहि त्या राक्षसाच्या हातून मरण पावला. चंद्रिका चंद्राला अनुसरते त्याप्रमाणें कुमुदभगिनी कुमुद्वती हिनेंहि सहगमन केलें.

संग्रामास निघतेवेळीं कुशानें दिलेल्या अंतिम आज्ञेला अनुसरून त्याच्या वृद्ध मंत्र्यांनीं अतिथीला सिंहासनावर बसविण्याचें ठरवून राज्याभिषेकासाठीं शिल्प्यांकडून चार खांबांचा विशाल मंडप उभारविला. हेमकुंभांत भरलेलें पवित्रोदक घेऊन राजाच्या पीठाभोंवतीं मंत्रिमंडळ उभें राहिलें. तो सिंहासनावर बसल्यावर, अखंड चाललेल्या तुताऱ्यांच्या गंभीर निनादानेंच त्याच्या अखंड व अप्रतिबद्ध उत्कर्षाचें अनुमान होत होतें. वृद्ध क्षत्रियांनीं दूर्वांकुर, भाताचीं लोंबरें, वडांच्या साली, व कोवळे आम्रपल्लव यांनीं युक्त असे कलश घेऊन त्याला ओंवाळिलें. मग जयसूचक अथर्वसूक्तांनीं पुरोहितप्रमुख ब्राह्मणांनीं त्याला अभिषेक केला. त्या वेळीं त्याच्या मस्तकावर पडणारी अभिषेकजलाची धार शंकराच्या मस्तकावर

पडणाऱ्या गंगेसारखीच शोभली ! बंदिजन त्याची स्तुति गाऊं लागले, तेव्हां चातकच जणूं काय वर्षाव करणाऱ्या मेघाचें अभिनंदन करीत आहेत असें वाटलें. विजेचें तेज जसें पर्जन्यधारांनीं वृद्धिंगत होतें, तसें या मंत्रपूत जलाच्या अभिषेकानें अतिथीचें तेज द्विगुणित झालें.

अभिषेक आटोपल्यावर त्यानें ब्राह्मणांस इतकें धन दक्षिणा म्हणून दिलें कीं, त्या ब्राह्मणांना स्वतःच भरपूर दक्षिणा देऊन यज्ञसमारंभ उरकतां आले असते. ब्राह्मणांनींहि संतुष्ट होऊन त्याला जे आशीर्वाद दिले ते त्याच्या पूर्वकर्मफलापुढें कांहींच नव्हते. आपल्या राज्यारोहणाप्रीत्यर्थ अतिथीनें बंदिवानांना बंधमुक्त केलें; वधार्ह अपराध्यांना जीवदान दिलें; घोडेबैलांच्या मानेवरील जोखड काढिलें; आणि गाईचें दूध काढूं नये अशी आज्ञा केली. पिंजऱ्यांत ठेवलेले शुकादि पक्षी त्याच्या आज्ञेवरून मुक्त करण्यांत येऊन ते स्वैर विहार करूं लागले.

तेथून अतिथि वस्त्रें व अलंकार धारण करण्यासाठीं दुसऱ्या स्वतंत्र वाड्यांत गेला व तेथें हस्तिदंती आसनावर जाऊन बसला. त्या ठिकाणीं अलंकार घालणारे लोक पवित्र होऊन त्याच्यावर अलंकार चढविण्यासाठीं साहित्य घेऊन आले. त्यांनीं माणकांनीं अलंकृत अशा त्याच्या मस्तकावर मोत्यांची मुंडावळ बांधिली आणि अंगाला कस्तुरीचंदनादिकांची उटी लाविली. नंतर त्यांनीं त्याला हंसाचीं चित्रें असलेलें रेशमी वस्त्र नेसविलें. अशा रीतीनें वस्त्रालंकारांनीं भूषित केलेल्या त्या राजाचें सोन्याच्या आरशांत पडलेलें प्रतिबिंब, सूर्य उगवला असतां कल्पतरूचें प्रतिबिंब जसें मेरूवर पडून शोभतें, तसें शोभलें !

मग राजचिन्हें धारण केल्यावर तो लोकांच्या जयजयकाराच्या घोषांत, इंद्राच्या सभेहून कोणत्याहि तऱ्हेनें न्यून नसलेल्या आपल्या राजसभेंत गेला आणि अनेक राजांच्या मस्तकावरील मण्यांशीं संघट्टन पावलेल्या

कुलागत सिंहासनावर विराजमान झाला. तेव्हां एकदम पूर्ण झालेल्या चंद्राप्रमाणें, कौमारावस्थेंतून अकस्मात् राज्यारूढ झालेला अतिथि, विशेषच शोभूं लागला.

त्याची मुखकान्ती नित्य प्रसन्न असे व तो नित्य मंदहास्यपूर्वक बोलत असल्यामुळें सेवकांना मूर्तिमन्त विश्वासच आहे असें वाटे. अग्नीच्या ज्वाळा धूमानंतर प्रादुर्भूत होतात; सूर्याचे किरण उदयानंतर दिसूं लागतात; पण त्या दोघांनाहि मागें टाकून अतिथीचा उदय गुणांबरोबरच झाला होता. त्याच्या अभिषेकजलानें भिजलेली वेदी वाळते न वाळते तोंच त्याचा असह्य प्रताप समुद्रतीरांपर्यंत जाऊन थडकला. त्याचे बाण व वसिष्ठाचे मंत्र यांची जोडगोळी असल्यावर कोणती इष्ट गोष्ट असाध्य होती ?

न्यायदानासाठीं धर्मशास्त्रपारंगत ब्राह्मणांची परिषद नेमून तिच्या साह्यानें तो वादिप्रतिवादींचे गुंतागुंतीचे व्यवहार निरलसपणें पाहात असे. महत्त्वाच्या कार्यावर सेवकांची योजना करतांना, ते तीं कार्यें हटकून सिद्धीस नेतीलच अशा रीतीनें तो त्यांच्यांशीं प्रसन्न अंतःकरणानें गोड बोलत असे. दिलेलें दान तो कधींहि काढून घेत नसे. तो जें बोले तें खरें करीत असे. एका गोष्टींत मात्र त्याचा व्रतभंग होई; ती गोष्ट म्हणजे शत्रूंचें उच्चाटण केल्यावर त्यांची पुनः स्थापना करणें ही होय. तारुण्य, सौंदर्य आणि ऐश्वर्य यांपैकीं एकेकानेंहि उन्मत्तपणा अंगीं येतो. पण अतिथीच्या ठायीं तिन्ही गोष्टी एकवटल्या असतांहि त्याचें मन निरभिमान राहिलें. तो नुकताच राज्यारूढ झाला असतांहि प्रजेच्या मनांत त्याच्याविषयीं प्रेम उत्पन्न झाल्यामुळें दृढमूल झालेल्या मोठ्या वृक्षाप्रमाणें त्यालाहि क्षुब्ध होण्याचा प्रसंग येत नसे.

बाह्य शत्रु केव्हां केव्हांच उपद्रव देतात व ते सामान्यतः दूर असतात; म्हणून अतिथीनें अंतःकरणांत नित्य वागणाऱ्या षड्रिपूंवरच विजय मिळविला. केवळ नीतीनें वागणाऱ्याला भित्रा म्हणतात; व जेथें तेथें शौर्य गाजविणाऱ्याला पशु म्हणतात; हें जाणून अतिथि हा नीति व शौर्य या दोहोंचाहि यथोचित उपयोग करून आपलें कार्य साधीत असे. त्याच्या राज्यामध्यें सर्वत्र गुप्त हेर पसरले असल्यामुळें निरभ्र आकाशांत सूर्याला जसें कांहींच अदृष्ट नसतें, तसें अतिथीलाहि अज्ञात असें कांहींच राहात नसे. आपलीं रात्रंदिवसाचीं कामें शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें तो निश्चयानें व नियमितपणें करीत असे. शत्रूच्या राज्यांत तसे स्वराज्यांतहि त्याचे हेर संचार करीत असून त्यांची एकमेकांना माहिती नसे, त्यामुळें यथाकाळीं निद्रा घेत असतांहि तो जागरूक असे. शत्रूवर चढाई करण्यास समर्थ असतांहि तो स्वतः दुर्भेद्य अशा दुर्गामध्यें राहात असे. बरोबरच आहे. कारण, हत्तीचीं गंडस्थळें फोडणारा सिंहसुद्धां पर्वताच्या सुरक्षित गुहेंतच राहातो.* त्याचे सर्व कल्याणप्रद उद्योग विचारपूर्वक आरंभलेले असल्यामुळें साळीचे दाणे जसे लोंबींत गुप्तपणें पोसत असतात तसे ते कोणास नकळत निर्विघ्नपणें पूर्णावस्थेस येत. उत्कर्षाच्या शिखरास पोंचला असतांहि तो कधींच भलतीकडे वाहवला नाहीं. समुद्राला भरती आली तरी त्याचें पाणी नदीमुखानेंच बाहेर येतें.†

प्रजेमध्यें यदाकदाचित् क्षोभ उत्पन्न झालाच तर तो तत्काळ शमविण्यास समर्थ असतांहि अतिथि आपण होऊन सहसा तसा क्षोभ उत्पन्न होऊं देत नसे. अंगीं बल असतांहि बलवानाशीं अतिप्रसंग न करितां ज्यांस सहज लीलेनें जिकतां येईल त्यांवरच तो हल्ला करीत असे. दावानलाला वायूचें साहाय्य अस-

* नहि सिंहो गजास्कंदी भयाद्गिरिगुहाशयः ।

† वृद्धौ नदीमुखेनैव प्रस्थानं लवणाम्भसः ।

तांहि तो पाण्यावर चढाई करण्याचा प्रयत्न करीत नाहीं.‡ धर्म अर्थ काम या तिघांपैकीं कोणाचीच्च अवहेलना न करितां अतिथि सर्वांना सारखेंच महत्त्व देत असे. दुर्बळांना मित्र केल्यास त्यांचा उपयोग होत नाहीं; सबळ हा प्रसंगीं उलटून पडण्याचा संभव असतो. म्हणून अतिथीनें मध्यम शक्तीच्या माणसांशींच स्नेह जोडला. शत्रूचें बलाबल व काळाचें योग्यायोग्यत्व पाहून तो पुढें पाऊल कसें टाकावयाचें तें ठरवी. मेघ सलिलपूर्ण असेल तरच चातक त्याची प्रार्थना करितात,§ तसें कोश भरलेला असेल तरच आपला आश्रय कोणी मागेल हें जाणून तो नित्य अर्थसंचय करी.

शत्रूचीं उत्कर्षसाधक कार्यें हाणून पाडून तो स्वतःचीं कार्यें पूर्ण करण्याचा यत्न करी; आणि आपलें वैगुण्य झांकून ठेवून शत्रुपक्षाकडील वैगुण्य दिसतांच त्यावर तो प्रहार करीत असे. दंड, कोश व अर्थ या त्याच्या तिन्ही शक्ति सर्पाच्या शिरावरील रत्नाप्रमाणें शत्रूला केव्हांहि हरण करतां आल्या नाहींत. पण लोहचुंबक लोखंडाला आकर्षून घेतो तद्वत् अतिथीनें मात्र त्या तिन्ही शक्ति शत्रूपासून हिसकावून घेतल्या. त्याच्या राज्यांतील व्यापारी वर्गाला नद्या म्हणजे घरच्या विहिरी वाटत; अरण्यें उद्याना-प्रमाणें भासत व पर्वतांचे घाट घरांतील जिने वाटत. तपस्व्यांचें तप निर्विघ्नपणें चालूं दिल्यामुळें व धनिकांच्या संपत्तीचें तस्करांपासून रक्षण केल्यामुळें, त्याला सर्व आश्रम व सर्व वर्ण यांपासून त्यांच्या प्राप्तीचा सहावा भाग मिळत असे.

खाणींतून रत्नें पुरविणें, शेतांतून धान्य उत्पन्न करणें, अरण्यांतून हत्ती मिळवून देणें या रूपांनीं पृथ्वी त्याला आत्मरक्षणार्थ जणूं वेतनच

‡ समीरणसहायोऽपि नाम्भःप्रार्थी दवानलः ।

§ अम्बुगर्भो हि जीमूतश्चातकैरभिनन्द्यते ।

तून दूरदेशीं प्रवास करणारांना समुद्रांतून सुखानें जातां येई आणि त्याचा कोश नित्य भरलेला असे.

निषध देशाच्या राजाची कन्या अतिथीची पत्नी होती. तिच्यापासून त्याला जो पुत्र झाला तो निषधपर्वतासारखाच बलवान असल्यामुळें त्याचेंहि निषध हेंच नांव त्यानें ठेविलें. आपल्या मागें त्याला राज्याचा धनी करून अतिथि स्वर्गस्थ झाला.

---

# कथा एकतिसावी

## वंशानुक्रम

—०—

निषधराजानें पुष्कळ दिवस निष्कंटक राज्याचा उपभोग घेतला. त्याच्या पश्चात् त्याचा पुत्र नल हा सिंहासनारूढ झाला. तो पित्यासारखाच पराक्रमी होता. नलाला नभस् नांवाचा पुत्र झाला. त्याचा वर्ण गगनसदृश असल्यामुळें त्याला ' नभस् ' असें म्हणत असत. आपल्यामागें नभसाला राज्याधिकार देऊन नल मोक्षसाधनासाठीं वनांत जाऊन मृगांच्या संगतींत राहूं लागला.

नभस् राजानंतर त्याचा पुत्र जो पुंडरीक, त्याच्याकडे राज्य आलें. पुंडरीकाच्या पुत्राचें नांव क्षेमधन्वा. तो राज्यकारभार सांभाळण्यास समर्थ झाला असें पाहून पुंडरीकानें राज्य त्याच्या स्वाधीन केलें आणि वनांत जाऊन तो तप करूं लागला. क्षेमधन्वा मोठा कीर्तिमान झाला. त्याचा मुलगा देवानीक हा देवतुल्य होता. याची कीर्ति स्वर्गापर्यंत गेली होती. क्षेमधन्व्यानें पुष्कळ वर्षें राज्य केल्यावर आपल्या गुणवान देवानीक नामक पुत्राच्या खांद्यावर राज्यधुरा देऊन तो देवलोकीं गेला.

देवानीकाचा पुत्र अहीनगु हा आपल्या मधुर भाषणामुळें मित्रांप्रमाणें शत्रूंनाहि प्रिय असे. मधुर भाषणाचा असाच प्रभाव आहे. घाबरून गेलेले हरीणहि मोहक शब्दानें वश करितां येतात !* अहीनगूला मनुष्यस्वभावाची चांगली पारख होती. तो कांहीं कालानें परलोकयात्रेस गेल्यावर त्याचा पुत्र जो पारियात्र त्याची सेवा राज्यलक्ष्मी करूं लागली.

---

* सकृद्विविग्नानपि हि प्रयुक्तं माधुर्यमीष्टे हरिणान् ग्रहीतुम् ।

तो विलासप्रिय होता. राज्य करणाराला खरें सुख मिळत नाहीं* हें जाणून त्यानें आपल्या शिल नामक शीलवान पुत्राला यौवराज्याभिषेक करून बहुत काल सुखविलास भोगिले. अतिविलासभोगानें त्याची तृप्ति कधींच होत नसे. त्यामुळें त्याला अकालींच वृद्धावस्था आली. जरा ही मत्सरिणी असते; तिला स्वतःला विलास भोगतां येत नाहींत व दुसऱ्याचे पाहवत नाहींत !

शिलाचा पुत्र उन्नाभ यानें तत्कालीन राजमंडलांत अग्रस्थान मिळविलें. उन्नाभाचा मुलगा वज्रणाभ हा वज्रधारी इंद्रासारखा तेजस्वी होता. वज्रणाभाच्या मागून त्याचा सुत शंखण यास राज्य मिळालें. त्यानें शत्रूंचा बींमोड केला. त्याचें देहावसान झाल्यावर त्याचा तनय व्युषिताश्व यास राज्यपद प्राप्त झालें. हा अश्विनीकुमारांसारखा सुंदर होता. काशीविश्वेश्वराच्या आराधनेमुळें ह्याला विश्वसह नामक पुत्र झाला. तो सर्व विश्वाचा सखा असून अखिल विश्वाचें भरण करण्यास समर्थ होता. त्याचा आत्मज हिरण्यनाभ हा विष्णूचा अंशभूत असून त्यानें सर्व शत्रूंला सळो का पळो करून सोडलें.

याप्रमाणें पुत्र कर्ता-सवरता झाल्यावर विश्वसह त्याला राज्य देऊन कृतकृत्य होत्साता वल्कलें धारण करून वानप्रस्थ झाला.

हिरण्यनाभानें यज्ञ केल्यावर त्याला कौसल्य नांवाचा पुत्र झाला. हा दुसरा चंद्रच आहे असें प्रजाजनांना वाटे. त्याचा पुत्र ब्रह्मिष्ठ हा ब्रह्मज्ञानी होता. त्यामुळें त्याला ब्रह्मप्राप्ति झाली. त्याच्या राजवटींत प्रजा अत्यंत सुखी होती.

ब्रह्मिष्ठाच्या पुत्राचें नांव पुत्र हेंच होतें. तो वयांत आल्यावर ब्रह्मिष्ठ विरक्त झाला व त्रिपुष्कर क्षेत्राच्या ठिकाणीं गमन करून तपश्चर्या करूं

* भृतं हि राज्ञां, उपरुद्धवृत्तम् ।

लागला. तेथेंच त्याला देवत्व प्राप्त झालें. पुत्राचा पुत्र पुष्य. तो राज्य करीत असतां सर्व लोक समृद्धिमान होते. त्यानें जैमिनीपाशीं योगविद्या शिकून मोक्षपदप्राप्ति करून घेतली.

पुष्याच्या पश्चात् त्याचा ध्रुवतुल्य पुत्र ध्रुवसंधि हा राज्यावर आल्यानंतर मृगयाप्रिय झाला आणि शेवटीं तो मृगया करीत असतां त्याला सिंहाच्या हातून मरण आलें. तेव्हां त्याचा तनय सुदर्शन हा एकटाच कुलतंतु आहे असें पाहून, तो अगदीं लहान असतांहि त्याला सर्व अमात्यांनीं मिळून गादीवर बसविलें.

# कथा बत्तिसावी

## चिमुकला राजा



मेघ अल्पाकार असला तरी वायूचें साहाय्य मिळालें असतां तो दहाहि दिशांना संचार करूं शकतो. अल्पवयी राजा असलेलें हें रघुकुल, प्रतिपच्चंद्रयुक्त आकाशासारखें, सिंहाचा एकच छावा असलेल्या वनासारखें, किंवा एकच कमलकोरकयुक्त जलाशयाप्रमाणें भासलें. सुदर्शन केवळ सहा वर्षांचा होता, तरीहि हत्तीवर बसून राजमार्गानें तो जाऊं लागला असतां लोक त्याला त्याच्या पित्याप्रमाणें मान देत. तो पित्याप्रमाणेंच पराक्रमी होणार असें तेव्हांच लोकांनीं भाकित केलें.

हा चिमुकला राजा आपलें कुलागत सिंहासन भरून काढण्याला स्वतः कितीसा पुरा पडणार ? पण त्याच्या सुवर्णगौर तेजानें मात्र तें व्यापलेलें दिसत असे. तो सिंहासनावर बसला असतां, कांचनाच्या पादपीठावर न पोंचणाऱ्या त्याच्या पायांचेंच वंदन राजांना करावें लागे. इंद्रनीलमणी आकारानें लहान असला तरी आपल्या अंगच्या तेजामुळें 'इंद्रनीलमणी' हें त्याचें नांव कांहीं खोटें ठरत नाहीं; त्याचप्रमाणें सुदर्शन अर्भक होता तरी 'महाराज' ही संज्ञा त्याला यथार्थपणेंच शोभत होती. त्याच्या दोन्ही बाजूंस सेवकजन चवऱ्या वारीत असतां त्याच्या झुलपांचे केस भुरभुर उडून गालांवर येत. त्याच्या गोजिरवाण्या हसऱ्या मुखांतून आलेले शब्द कोणीहि खालीं पडूं देत नसे. भूषणांचाहि त्रास व्हावा इतकें त्याचें शरीर नाजूक व शिरीषपुष्पाप्रमाणें सुकुमार असतांहि, तो आपल्या नैसर्गिक प्रभावामुळें पृथ्वीची अत्यंत जड धुरा मात्र लीलेनें वागवीत असे. तो आपल्या

ललाटावरच सोन्याची तिटी ( तिलक ) लावीत असे; तथापि शत्रूंच्या स्त्रियांना मात्र आपला तिलक पुसावयास लावी !

सुदर्शनाचीं पाटीवर सगळीं मुळाक्षरें पुरीं होण्यापूर्वींच, वृद्ध व ज्ञानी पुरुषांच्या संगतीमुळें त्याला संपूर्ण राजनीतीचीं तत्त्वें व्यवहारांत आणतां येऊं लागलीं. त्याच्या बाहूंना धनुष्याच्या दोरीचे घट्टे पडले नव्हते व तरवारीच्या मुठीलाहि त्याचा स्पर्श झाला नव्हता, तरीहि त्याच्या बाहुबलानें पृथ्वीचें रक्षण होत होतें.

जसजसा काळ लोटत चालला तसतसे बालराजाचे शरीरावयवच पुष्ट झाले असें नाहीं तर बीजरूपानें असलेले, आणि लोकांना आपलेसे करून सोडणारे त्याचे आनुवंशिक गुणहि विकास पावले. त्याला शिक्षण देणाऱ्या गुरूंना मुळींच क्लेश पडले नाहींत, जणूं काय पूर्वजन्मीं पूर्णपणें अवगत झालेल्या धर्मार्थकामांचें मूळ अशा तिन्ही विद्याच त्याला अनायासें प्राप्त झाल्या ! अस्त्रविद्येचें शिक्षण घेत असतां, तो शेंडी बांधून, डावा पाय वाकवून, छातीचा भाग किंचित् फुगवून, धनुष्यावर लाविलेला बाण आकर्ण ओढीत उभा राहिला म्हणजे त्याची अपूर्व शोभा दिसत असे.

असें होतां होतां त्यानें तारुण्यांत प्रवेश केला, तेव्हां त्याच्या अमात्यांनीं अनेक राजकन्यांचीं चित्रें आणवून त्यांच्यांतील अनुरूप अशा वधूंशीं त्याचे विवाह लाविले.

---

# कथा तेहतिसावी

## हा कशाचा परिणाम ?



सुदर्शन सम्राट हा वृद्ध झाला, तेव्हां त्यानें आपल्या अग्नितुल्य अशा अग्निवर्ण नामक तनयाला राज्याधिकार दिला आणि स्वतः तो तपश्चर्येसाठीं नैमिषारण्यांत निघून गेला. तेथील तीर्थजलानें त्याला आपल्या राज्यांतील विहारवापीचा विसर पाडला. भूमीवर अंथरलेल्या दर्भांवर निद्रा घेत असतां त्याला शयनागारांतील शय्येची आठवणहि झाली नाहीं. आणि पर्णकुटींतील निवासापुढें प्रासादांतील राहणीकडे त्याचें लक्ष गेलें नाहीं. अशा रीतीनें त्यानें निष्काम तपश्चरण करून पुण्यसंचय केला.

त्याच्यामागून राजा झालेला जो अग्निवर्ण त्याला राज्याचें रक्षण करतांना कांहींच त्रास वाटला नाहीं. कारण सुदर्शनानें आपल्या बाहुबलानें स्वराज्य पूर्ण निष्कंटक करून त्याच्या जणूं उपभोगासाठींच तें दिलें होतें. तो विलासप्रिय होता; तथापि कित्येक वर्षें त्यानें प्रजापालनाचें कार्य स्वतः पार पाडलें. पण पुढें सर्व राज्यभार सचिवांवर सोपवून तो सर्वथैव स्त्रैण बनला. गायन, वादन, नर्तन इत्यादि कलांत तो प्रवीण झाला व सर्वकाळ त्यांतच दंग झाला.

त्याला रात्रंदिवस अंतर्गृहांतच राहणें आवडूं लागलें व प्रजाजनांपैकीं कोणालाहि भेट देण्याची त्याला इच्छा होईना. क्वचित् मंत्र्यांनीं आग्रह केलाच तर त्यांचा मान राखण्यासाठीं कोणाला भेट देण्याचें त्यानें मनांत आणलेंच तर, पुष्पशय्येवर लोळतां लोळतां खिडकींतून पाय बाहेर काढून त्याचें दर्शन घेण्यास त्यांना सांगे. राजदर्शनोत्सुक प्रजाजनहि राजभक्तीनें त्याच्या पायांलाच प्रणिपात करीत.

अग्निवर्णाला मद्यप्राशनाची चटक लागली. नर्तकींच्या नाचांत रंगून जाऊन तो स्वतः मृदंगाची साथ करीत असे.

याप्रमाणें केवळ इंद्रियसुखाच्या मागें लागून इतर सर्व कार्यांकडे त्यानें पाठ फिरविली. त्याच्या राज्याची व्यवस्था प्रधानांनीं नीट ठेवि-ल्यामुळें इतर राजांना त्याच्यावर आक्रमण करितां आलें नाहीं. तथापि अतिविषयोपभोगामुळें त्याच्या शरिरांत रोगांनीं घर केलें आणि दक्षाच्या शापानें जसा चंद्र तसा त्या रोगांनीं अग्निवर्ण दिवसानुदिवस क्षीणक्षीण होऊं लागला. विषयोपभोगाचा असा दुष्ट परिणाम उघड्या डोळ्यांनीं पाहात असतांहि व राजवैद्य उपदेश करीत असतांहि त्यानें आपला नित्य क्रम सोडिला नाहीं. एकदां विषयांची गोडी लागली म्हणजे इंद्रियांना त्यांपासून परावृत्त करणें दुष्कर होय* !

हळूहळू अग्निवर्णाचा मुखवर्ण फिकट झाला. त्याला आधाराशिवाय धड चालतांहि येईनासें झालें. त्याच्या तोंडांतून निघणारा शब्द अगदीं मंद व हळू येऊं लागला. त्याला आभरणांचें ओझें वाटूं लागलें. अशा रीतीनें त्याला क्षयाची भावना झाली असतां थोडी वात उरलेल्या दिव्याप्रमाणें रघुकुलाची अवस्था झाली.

आपल्या राजाला राजयक्ष्मा झाला आहे याची गंधवार्ताहि मंत्रिमंडळानें लोकांना लागूं दिली नाहीं. राजावर कांहींतरी अकल्पित संकट आलें आहे अशी भीति वाटून चौकशी करणाऱ्या प्रजेला ‘राजा पुत्रप्राप्तीस्तव कांहीं अनुष्ठान करीत आहे’ असें ते मंत्री वारंवार सांगत. अशा रीतीनें अंतःस्थ कारण गुप्त ठेवून दिखाऊ कारणें पुढें करून ते लोकांच्या अधीर मनाचें समाधान करीत. तथापि कांहींतरी अनर्थ ओढवणार म्हणून प्रजाजनांचीं मनें साशंक झालीं.

---

* स्वादुमिस्तु विषयैर्हृतस्ततो दुःखमिंद्रियगणो निवार्यते ।

मोठमोठ्या मी मी म्हणणाऱ्या राजवैद्यांची या राजयक्ष्म्यापुढें मात्रा चालेना. शेवटीं अनेक स्त्रियांचा पति असतांनाहि अपत्यप्राप्ति न होतांच अग्निवर्ण राजा या दुःसाध्य अशा रोगाला बळि पडला. दिवा मोठा असला तरी वायूपुढें काय करणार ?

असो. त्या वेळीं सुदैवानें अग्निवर्णाची पट्टराणी गरोदर होती हें पाहून त्याच्या अमात्यांनीं लोकधुरीणांची सभा भरवून त्यांच्या अनुमतीनें तिचीच राज्याधिकारावर योजना केली; आणि तदनुसार तिलाच त्यांनीं विधियुक्त अभिषेकहि केला. तेव्हांपासून ती सम्राज्ञीच सुवर्णसिंहासनावर बसून आपल्या वृद्ध मंत्र्यांच्या साह्यानें प्रजेच्या कल्याणासाठीं राज्यशकट हाकूं लागली.



# विद्वानांचे अभिप्राय



— १ —

'रघुवंशकथा' ह्या पुस्तकांत श्री. नीलकंठ शंकर नवरे यांनीं कालिदासाच्या रघुवंशांतील निरनिराळ्या राजांचीं चरित्रें दिलीं आहेत. प्रस्तुत पुस्तक म्हणजे कालिदासाच्या रघुवंशाचें छोटें भावंडच होय असें म्हणायला कांहींच हरकत नाहीं. दुय्यम शाळांतील ५-६ व्या इयत्तांतील मुलें या रघुवंशकथा आनन्दानें वाचतील, कारण मूळ ग्रंथांतील दिलीप, रघु, अज, दशरथ, रामचंद्र इत्यादि महनीय राजर्षींच्या चरित्रांतील अद्भुतरम्य प्रसंगांची निवड करतांना श्री. नवरे यांनीं आपल्या बालवाचकांना काय आवडेल, त्यांना काय झेपेल वगैरे मुद्दे दृष्टीआड होऊं दिले नाहींत. कथानकाचा संसार ते थोडक्यांत आटोपतात, कथेचें अनुसंधान संभाळतात. ह्यांशिवाय मुळांतील संस्कृत श्लोकांचें मराठींत भाषांतर करून, कालिदासाचें वर्णनकौशल्य, त्याचें उपमेवरील प्रभुत्व आणि सहजसुंदर अर्थान्तरन्यास इत्यादि रघुवंशाचे श्रेष्ठ गुण अल्प प्रमाणांत कां होईना-पण आपल्या पुस्तकांत आणावेत-निदान त्यांची छटा तरी त्यांत दिसावी-अशा रीतीनें ह्या पुस्तकाची रचना केली आहे. निरनिराळ्या प्रसंगांना अनुलक्षून मधून मधून दिलेलीं सुभाषितें एकत्र करून शेवटीं त्यांची यादी दिली आहे. पुस्तकांत चित्रांचा समावेश केल्यानें तें बालवाचकांना जास्तच आकर्षक वाटेल. एकंदरींत श्री. नवरे यांची ही कृति मुलांस, त्याचप्रमाणें थोरांमोठ्यांस, मनोरंजक आणि उद्बोधक होईल अशी मला खात्री वाटते.

पुणें, २२-१२-१९३२. } **रामचंद्र कृष्ण लागू, एम्. ए.,**
प्रोफेसर, सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें.

— २ —

येथील नॉर्थकोट हायस्कूलचे संस्कृत विषयाचे शिक्षक श्रीयुत नीलकंठराव नवरे बी. ए. ( ऑनर्स ) यांनीं लिहिलेलें 'रघुवंशकथा' नामक पुस्तक मीं समग्र वाचून पाहिलें व खरोखरीच मला मोठा आल्हाद वाटला. मूळ संस्कृत रघुवंशकाव्याशीं त्यांचा मार्मिक परिचय असून त्याचा त्यांनीं प्रस्तुत पुस्तक-लेखनाचे कामीं फारच कुशलतेनें उपयोग केला आहे असा पुस्तक वाचतां वाचतां अनुकूल ग्रह होतो. कथांची रचना मुळांतील विविध कथासूत्रांशीं सुसंबद्ध असून भाषासरणीहि क्लिष्ट नसून उलट ती सरलार्थ व ओघवती असल्यानें मूळ काव्यांतील त्या त्या मनोहर प्रसंगांची अकुंठित प्रत्यभिज्ञा होऊं शकते; आणि म्हणून एकदां पुस्तक वाचण्यासाठीं हातांत घेतलें असतां, त्यांत मन इतकें कांहीं तल्लीन होतें कीं, तें संपविल्यावांचून हातांतलें खालीं ठेवूंच नयेसें होऊन जातें. एका भाषेंतील ग्रंथकर्त्यांचे विचार, त्यांतूनहि अभिजात महाकवींचें हृदय, दुसऱ्या भाषेंत मुळांतील स्वारस्य विकृत न होऊं देतां तंतोतंत प्रतिबिंबित करणें ही कला एखाद्या स्वतंत्र ग्रंथरचनेहूनहि तारेवरील कसरतीसारखी अधिक अवघड आहे. तथापि ती श्रीयुत नवरे यांस उत्कृष्ट साधली आहे हें रघूचा दिग्विजय, इंदुमतीचें स्वयंवर, दशरथाची मृगया, रामाचा पुष्पकविमानसंचार इत्यादिइत्यादिपर मराठींतील त्यांची चटकदार भाषेची सजावट पाहतां तेव्हांच स्पष्ट होतें.

महाकवि कालिदासाचें रघुवंश काव्य हें केव्हांहि द्राक्षारसाप्रमाणें सहज-सुरस, प्रसादपूर्ण, साहित्यदृष्ट्या सर्वांगसुंदर अतएव नितांतरमणीय असें आहे. आणि म्हणूनच कीं काय पंचमहाकाव्यांत त्यास प्राथम्य दिलेलें असावें. अशा या सर्वतोमान्य संस्कृत रघुवंश काव्याच्या अभ्यासकांस श्रीयुत नवरे यांचें हें पुस्तक निःसंशय साहाय्य करील.

ता. २६-१२-३२.

सदाशिव केशव श्रोत्रिय,
भावोपहार व भक्तिविहार या ग्रंथांचे कर्ते,
सोलापूर.

## नी. शं. नवरे, बी. ए., बी. टी., यांचीं इतर पुस्तकें

### मुंबई, वऱ्हाड व मध्यप्रांत सरकारनें मंजूर केलेलीं

( १ ) संस्कृत कवींचीं नाट्यकथानकें ( द्वितीयावृत्ति किं. ८१० ) या पुस्तकांत शाकुन्तल, विक्रमोर्वशीय, मुद्राराक्षस, वेणीसंहार, स्वप्नवासवदत्त, मृच्छकटिक, व उत्तररामचरित या नाटकांचीं संविधानकें, मुळांतील स्वारस्य व सौंदर्य कायम ठेऊन, मराठींत सुबोध व चटकदार भाषाशैलीनें ग्रथित केलीं आहेत.

( २ ) मराठी कादंबरी-कथा—(द्वितीयावृत्ति किं. ८८) या पुस्तकांत बाणभट्टकृत कादंबरीच्या कथानकाची गुंतागुंत कुशलतेनें सोडविली असून मुळांतील मोहकता व माधुरी कायम ठेविली आहे. संस्कृत 'कादंबरीसार' वाचतांना या मराठी पुस्तकाचा फार उपयोग होतो.

कांहीं शाळांतून हीं पुस्तकें पुरवणीवाचनासाठीं लाविलेलीं आहेत. मराठी भाषेंत अशा प्रकारचीं पुस्तकें हीं पहिलींच असून तीं विद्वन्मान्य झालीं आहेत. शाळा-कॉलेजांतील विद्यार्थी व इतर जिज्ञासु वाचक यांसहि तीं उपयुक्त, बोधप्रद व मनोरंजक आहेत.

## नवीन पुस्तक

इंग्रजी सहाव्या व सातव्या इयत्तेंतील विद्यार्थांस अत्यंत उपयुक्त

### संस्कृत कादंबरीकथा ( ले. नी. शं. नवरे )

बाणभट्टाची कादंबरी ही एका गोष्टींतून दुसरी गोष्ट अशा रीतीनें लिहिलेली असल्यामुळें संस्कृत वाचकाला मूळ कथानकाचें अनुसंधान दृष्टीच्या टप्प्यांत ठेवणें साहजीकच कठीण जातें. म्हणून प्रस्तुत पुस्तकांत ३५ प्रकरणांमध्यें **बाणाच्या शब्दांतच** तीनहि जन्मांतील पात्रांच्या कथा यथाक्रम लिहिल्या असून कथानकाची गुंतागुंत कुशलतेनें सोडविली आहे. प्रथमारंभीं महाश्वेता व कादंबरी यांची ओळख करून देऊन शूद्रकाची कथा शेवटीं आणिली आहे. मराठी कादंबरीकथेच्या धर्तीवरच ह्या पुस्तकाचें स्वरूप व धोरण राखिलें आहे. पृष्ठ संख्या अदमासें १०० ( छापत आहे )